


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १७ वे ] ऑगस्ट १९६४ [ अंक ११



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सतरावे

अंक अकरावा

# नवभारत

ऑगस्ट

१९६४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर — प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, 'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर, १८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २, फोन नं. २३५५४

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) | धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) | धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६३·०० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... ... ... | ३०·०० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | २३०·०० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | ६·०० |
| (७) | बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | २०·०० |
| (८) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | ५·०० |
| (९) | वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | ६·०० |
| (१०) | नवमानवतावाद ... ... ... ... | २·५० |
| (११) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ३·०० |
| (१२) | चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | |
| | ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | ३·०० |
| (१३) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | २·५० |
| (१४) | महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | |
| | ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | २·०० |

अनुक्रमणिका

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# कै. वि. का. राजवाडे जन्मशताब्दी

## राजवाडे जन्मशताब्दी १९६४ मध्ये की १९६३ मध्ये ?

या अग्रगण्य भारतीय इतिहाससंशोधकाचा जन्म-दिन कोणता ? या संबंधात राजवाडे यांचे भक्त कै. भा. वा. भट यांनी अत्यंत विस्तृत लिहिलेल्या चरित्रात असे म्हटले आहे:-“ विसूभाऊंचा जन्म ( टीप- श्री. दत्तोपंत पोतदार यांचा दिनांक ४ जानेवारी १९२७ चा केसरीचा लेख. ) शके १७८६ आषाढ शुद्ध ८ म्हणजे दिनांक १२ जुलई इ. स. १८६४ रोजी झाला. त्यानंतर थोडेच दिवसानी त्यांचे वडील इ. स. १८६७ साली वारले. या वेळी राजवाडे यांचे वडील बंधू वैजनाथ हे आठ वर्षाचे होते. वडील वारल्यामुळे राजवाड्यांची मातुश्री, वडील मुलगा वैजनाथ व लहान मुलगा विश्वनाथ यासह वरसईस मुलांच्या आजोबाकडे म्हणजे आपल्या वडिलांकडे राहण्यास गेली. राजवाड्यांचे चुलते जगन्नाथ बापुजी राजवाडे हे पुणे जिल्ह्यांतील वडगांव या गावी मराठी वकील होते. इ. स. १८९५ च्या मे महिन्यात हे गृहस्थ वारले. त्याच्या कुटुंबाचे नाव लक्ष्मीबाई असे होते; व ती पुढे १४-१५ वर्षे तिचे निधनापावेतो म्हणजे इ. स. १९१० पावेतो वैजनाथपंत यांचेकडेच रहात होती. चुलत्यांचे हयातीत कधी कधी वडगावी वैजनाथपंत व विसूभाऊ हे त्याच्याकडे रहावयास जात असत.” (पृ. ४४) भट या चरित्रग्रंथात श्री. दत्तोपंत पोतदार याच्या केसरीतील लेखाच्या आधारे राजवाड्यांचा जन्मदिन देतात. याविरुद्ध पुरावा मिळतो तो कै. साने गुरुजींनी लिहिलेल्या (अभिनव ग्रंथमालेतील ७ वे पुष्प) ‘राजवाडे यांचे चरित्र’ या पुस्तकात मिळतो. ते म्हणतात : “ कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे याचा जन्म शके १७८५ आषाढ शु. अष्टमीस झाला. त्यांच्या आईचे नाव यमुना.” शके १७८५ म्हणजे इ. स. १८६३ होय. राजवाडे याचे छायाचित्र या पुस्तकास जोडले आहे त्याच्या खाली जन्म, आषाढ शु. ८ शके १७८६ (सन १८६४) असे म्हटले आहे. त्याचा खुलासा करताना साने गुरुजी ‘चरित्रलेखकाचे दोन शब्द’ या प्रारंभीच्या निवेदनात म्हणतात की राजवाडे यांच्या छायाचित्रा-वर जन्म शक १७८६ घातला गेला, तो, केसरीतून घेतला गेला. परंतु राजवाडे तिलांजलि अंकात १७८५ हा शक त्यांच्या कुंडलीत आहे. तोच खरा समजला पाहिजे. नव्या दिल्लीच्या साहित्य अकादेमीतर्फे आम्ही संपादिलेल्या “राजवाडे लेखसंग्रह” या पुस्तकातील छायाचित्रावर जन्म १२ जुलै १८६४ दिला. परंतु प्रस्तावनेत साने गुरुजींच्या पुस्तकास अनुसरून जन्म आषाढ शु. ८, शके १७८५ (सन १८६३) दिला आहे. सानेगुरुजींचे म्हणणे प्रमाण मानणे अधिक सयुक्तिक वाटते, राजवाडे यांची जन्मशताब्दी सन १९६३ साल ठरते; चालू सन १९६४ ठरत नाही. भारतीयांच्या ऐतिहासिक जाणीवेत कालसंवेदनेची उणीव आहे, असे विधान स्पेंग्लर या इतिहास तत्त्व-वेत्त्याने आपल्या Decline of the West या ग्रंथात केले आहे; त्याची असंख्य प्रत्यंतरे भारताच्या इति-हासात मिळतातच. आता त्याला दुजोरा विसाव्या शतकातील भारतीय सर्वोत्तम इतिहास संशोधकाचा जन्मसंदेहही देतो. वस्तुतः संदेह राहण्याचे कारण नाही. राजवाडे यांचे एक दुसरे भक्त व आमचे मित्र कै. वा. दा. मुंडले यानी ही चूक पूर्वीच दुरुस्त केली होती. मुंडले स्वतः ज्योतिषी होते. ते वाईस १९४२ साली आमच्या प्राज्ञपाठशाळेत ४ महिने प्रकृतिस्वास्थ्या-करिता इस्लामपूरहून राहण्यास आले होते. तेव्हा त्यानी आमच्या मुलामुलींच्या कुंडल्या लिहिल्या. त्यानी वि. का. राजवाडे यांची जन्मकुंडली इतिहास संशो-धकांचे वडीलबंधू वै. का. राजवाडे यांच्याकडून श्री.द. वा. पोतदार यांच्या हस्ते आणवून राजवाडे तिलांजली अंकात प्रसिद्ध करून संशयनिवारण केले, असे आम्हास सांगितले. जुलै ११, (१९६४) ला आम्ही अमे-रिकेची यात्रा संपवून मुंबईस आल्यानंतर लगेच राज-वाडे यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने नियतकालिकांचे







रकाने भरून प्रसिद्ध होत असलेले पाहिल्याबरोबर मुद्दाम उपरिनिर्दिष्ट राजवाडे लेखसंग्रहाची आम्ही लिहिलेली प्रस्तावना पाहिली; त्यावरून हे सर्व आठवले.

## प्राथमिक, मध्यम व उच्च शिक्षण

राजवाडे यांचे बालपण व प्राथमिक शिक्षण पुणे जिल्ह्यांतील वडगाव येथे झाले. त्यांचे वडील बाळपणीच वारल्यामुळे शिक्षण प्रथम चुलत्याजवळ झाले. भाषा व गणित या दोन्ही विषयात सारखीच उत्तम गती प्राप्त झाली. त्यांची प्रकृति कणखर व कष्ट सहन करणारी होती व ती तशी अखेरपर्यंत टिकली. याचे कारण लहानपणापासून शरीरश्रमाची आवड होय. मुळातच चांगली रग असल्यामुळे मस्ती, धांगडधिंगा, मारामारी, करण्यात लहानपण गेले. विटीदांडू, आट्यापाट्या, खोखो, पोहणे व पळणे यात पहिली किशोर-अवस्था गेली. महाविद्यालयीन शिक्षण संपेपर्यंत हा नाद टिकला. यामुळे शरीरयष्टी बळकट व काटक बनली. जन्मभर कष्ट करण्याची हौस व उत्साह टिकला.

माध्यमिक व बहुतेक उच्च शिक्षण पुणे येथे झाले. त्यांनी आपले विद्यार्थीदशेतील शिक्षणविषयक अनुभव, 'कनिष्ठ, मध्यम व उच्च शालातील अनुभव' या विस्तृत (छापील ५० पृष्ठाच्या) लेखात नमूद केले आहेत. त्यांच्या आत्मचरित्राचे हे एक उत्तम प्रकरण आहे. हा लेख उत्कृष्ट साहित्याचा एक नमुना म्हणून मराठीत कायम राहीलच पण त्याशिवाय त्यांत त्या वेळच्या भारतीय शैक्षणिक संस्थांचेही दर्शन घडते आणि इंग्लिशांनी निर्माण केलेल्या शिक्षणपद्धतीच्या गुणावगुणांची गंभीर मीमांसा वाचावयास मिळते. राजवाडे यांची नैसर्गिक बुद्धिमत्ता विशाल होती. त्या बुद्धिमत्तेचा संपूर्ण उपयोग होऊन बौद्धिक प्रगति व्हावी अशा प्रकारचे सकस शिक्षण देण्याची योग्यता असलेल्या शिक्षकांचा आजसारखाच दुष्काळ त्या वेळच्या मध्यम व उच्च शिक्षणसंस्थामध्येही होता. म्हणून राजवाडे यासंबंधी म्हणतात की, 'पंतोजी (शिक्षक) आडमुठे, पोटभरू, इकडची पाटी तिकडे नेऊन टाकणारे होते, जर चांगला शिक्षक (हायस्कूलमध्ये) मिळता तर ३ वर्षात बी. ए. इतकी तयारी झाली असती.' मध्यम शिक्षण देणाऱ्या इंग्लिश शाळांबद्दल ते आपल्या लेखात असे सांगतात की, त्यांना एकंदर पुणे येथील तीन इंग्लिश शाळांमध्ये क्रमाने शिकण्याचा योग आला. प्रथम सन १८७६ मध्ये बाबा गोखले यांच्या शाळेत ते दाखल झाले. शाळेचे ठिकाण गलिच्छ, दुर्गंधाचे माहेरघर, पडक्या भिंती, जवळच उघडी गटारे, आणि पाऱ्यांचे पायखाने; शिक्षक चुकार, एका तासात ५-१० मिनिटेच वर्ग-शिक्षण देत. नंतर ते वासुदेव बळवंत फडके (बंडवाले) यांनी स्थापन केलेल्या हायस्कूलमध्ये प्रविष्ट झाले. या संस्थापकाने सद्बुद्धीने शाळा काढली होती परंतु तेथेही नालायक शिक्षक पुष्कळ; नंतर ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या हायस्कूलमध्ये प्रवेश मिळविला. तेथेही अनेक शिक्षक व्यसनी, दारुडे व अनाचारी दिसले. सर्वत्र आचारहीन व देशभक्तीचा लेशही नसलेलेच शिक्षक भरलेले होते. त्यास मोठा अपवाद म्हणजे कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी स्थापलेले न्यू इंग्लिश स्कूल होय. यासंबंधी राजवाडे लिहितात की, ते स्थापताना चिपळूणकरांनी अशी प्रतिज्ञा केली होती की, आपल्या शिक्षणसंस्थेला गोऱ्या इंग्लिश साहेबाचा पाय लागू द्यावयाचा नाही. परंतु चिपळूणकर अल्पायुषी ठरले. त्यांच्याही संस्थेत संस्थाचालकांनी मागाहून इंग्लिश गोऱ्या अधिकाऱ्यांचे सुस्वागत करण्याची प्रथा सुरू केली.

सन १८८२ जानेवारीत राजवाडे मुंबई विद्यापीठाची प्रवेशपरीक्षा (मॅट्रिक) उत्तीर्ण झाले. मुंबईच्या सुप्रसिद्ध एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये पहिली सहामाही काढली. नंतर पैसे नसल्यामुळे कॉलेज सोडावे लागून पोट भरण्याकरिता खाजगी माध्यमिक शिक्षण देण्याचा वर्ग काढला. पुढे १८८४ साली वडील बंधु प्रा. वैजनाथ काशिनाथ राजवाडे यास पुणे येथील डेक्कन कॉलेजात फेलोशिप मिळाली. त्यामुळे वडील बंधूंच्या मदतीने डेक्कन कॉलेजात विश्वनाथपंत राजवाडे याना शिक्षणास अवसर मिळाला. या कॉलेजात त्यावेळी भारतीय कीर्तीचे विद्वान न्यायकोशकर्ते म. म. भीमाचार्य झळकीकर, डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर इत्यादि प्राध्यापक होते. या कॉलेजमध्ये राजवाडे यानी ६ वर्षे काढली. १८९० साली जानेवारीत ते बी. ए. उत्तीर्ण झाले. क्रमाने प्रत्येक वर्षी ते परीक्षेस बसलेच नाहीत. लहर येईल तेव्हा एका वर्षाचा अध्ययनक्रम २ महिन्यात तयार करून परीक्षेस बसावयाचे व उत्तीर्ण व्हावयाचे, मधली अनेक वर्षे गाळली, कारण

कॉलेजमधील परीक्षेस नेमलेल्या अनेक पुस्तकांच्या अध्ययनात त्याना कालक्षेप करणे आवडले नाही. तर्कसंग्रह, लार्ड बेकन, इ. पुस्तके जुन्या पुराण्या बाधित झालेल्या सिद्धांतानी भरलेली होती. अतएव त्यांचे अध्ययन व्यर्थ होय, असे त्याना वाटे. म्हणून त्यानी या कालखंडात पाश्चात्य ग्रंथकारांच्या इतिहास, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, साहित्य या दृष्टीने महत्त्वाच्या मोठमोठ्या ग्रंथांचे परिशीलन करण्यात व समवयस्क विद्यार्थ्यांबरोबर गप्पा छाटण्यात बराच वेळ घालविला आणि त्या बरोबरच्च शारीरिक व्यायाम करून शरीरसंपत्ति कमावली. कॉलेजच्या ७ वर्षात ते कधीही आजारी पडले नाहीत. कॉलेज–शिक्षणातील परीक्षांची पद्धति त्याना कंटाळवाणी व खुळचटपणाची वाटली. कॉलेजमध्ये दाखल झाल्यापासूनच त्यानी सरकारी नोकरी करावयाची नाही असा निश्चय केला होता; त्यामुळे परीक्षा उत्तीर्ण होण्याला त्यानी बिलकुल महत्व दिले नाही व त्यामुळे तेथील शिक्षक व विद्यार्थी यांच्याशी त्यांचे घनिष्ठ संबंधही निर्माण झाले नाहीत. या संबंधी ते म्हणतात, " शिक्षकाशी व परीक्षार्थ्यांशी माझा फारसा स्नेह झाला नाही याचे मुख्य कारण हेतूंची भिन्नता होय. शिक्षकांचा हेतु मुले परीक्षेकरता तयार करण्याचा, मुलांचा हेतु परीक्षा देऊन नोकरी मिळविण्याचा आणि माझा हेतु केवळ विद्यार्जन करून पूर्णपणे स्वतंत्र धंदा करण्याचा. केवळ विद्यार्जन करण्याचा हेतु बाळगणारा मी नोकर तयार करण्याच्या गिरणीत जाऊन पडलो......सरकारी नोकरी म्हणून करावयाची नाही असा दृढतर ग्रह माझ्या मनाचा झाला...... बाजवीच आहे की ह्या भाडोत्री शिक्षकांच्या गुलामगिरीच्या नोकऱ्यांचा व कंटाळवाण्या परीक्षांच्या पासून मी पराङ्मुख झालो व पुस्तकालयातील ग्रंथांकडे एकदिलाने वळलो. १८८४ पासून १८९० पर्यंतच्या सात वर्षात व पूर्वीच्या दोन वर्षात युरोपियन इतिहास, अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, तत्वज्ञान, तर्कशास्त्र व मानसशास्त्र ह्यावरील प्राचीन व अर्वाचीन, अस्सल व भाषान्तरित बरेच ग्रंथ मी मननपूर्वक वाचले. शिवाय वनस्पति शास्त्र व फारशी भाषा कामापुरती मी शिकलो... प्लेटोचे सुराज्य (रिपब्लिक) मी याचवेळी सबंध मराठीत उतरले... ह्या (सरकारी) शिक्षण पद्धतीचा मुख्य हेतु जो नोकरी करिता परीक्षा देणे तो मी बहुतेक अजीबात झुगारून दिला. त्यामुळे ह्या शिक्षण पद्धतीने जे एक प्रकारे मानसिक दौर्बल्य येते व कर्तृत्वशक्तीचा ऱ्हास होतो, तो माझ्या ठायी झाला नाही. परंतु एका दुष्ट खोडीने मात्र मला अतोनात ग्राशिले. ती खोड म्हणजे दुसरी तिसरी काही नाही. इंग्रजी बोलण्याची व इंग्रजीत विचार करण्याची... सतत पंधरा वर्षे बारा आणि बारा चोवीस तास सर्व कामे मी इंग्रजीत करू लागलो ... परंतु-दोघा तिघा गृहस्थानी मला ह्या विपत्तीतून वाचविले. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या टीकात्मक निबंधांनी इंग्रजीच्या ह्या खग्रासापासून माझा बचाव केला. काव्येतिहाससंग्रहकारांच्या ऐतिहासिक पत्रांनी स्वदेश म्हणून काही आहे हे मला कळले व परशुरामतात्या गोडबोले ह्यानी छापलेल्या काव्यांनी महाराष्ट्रसारस्वताचा मला अभिमान वाटू लागला." यावरून राजवाडे याच्या ध्येयवादी जीवनाची नांदी महाविद्यालयीन शिक्षणाच्या समयीच सुरू झाल्याचे निदर्शनास येते.

### भारतास नव्या ज्ञानविज्ञानांचा प्रकाश लाभावा हा जीवनोद्देश

महाविद्यालयीन शिक्षण संपल्याबरोबर त्यांचा विवाह झाला. परंतु पत्नी थोडयाच अवधीत कालवश झाल्यानंतर राजवाडे यांच्या ध्येयवादी जीवनाला म्हणजे दीर्घ अशा ज्ञानमय तपाला एकाग्रता लाभली. सन १८९५ मध्ये त्यांनी ' भाषांतर ' हे मराठी मासिक सुरू केले. त्यात प्लेटो, ॲरिस्टॉटल, गिबन इत्यादी पाश्चात्य ग्रंथकार व शंकराचार्य इत्यादी भारतीय ग्रंथकार यांच्या ग्रंथांची भाषांतरे क्रमाने प्रसिद्ध करणे हा त्यांचा उद्देश होता. त्याकरिता अनेक संस्कृतच्या व इंग्लिशच्या विद्वान पदवीधरांचे साहाय्य त्यांना मिळू लागले. ते 'भाषांतर' मासिक ३७ महिने चालले. परंतु त्या मासिकाच्या प्रथम अंकातील प्रास्ताविक लेखावरून राजवाडे यांचा जीवनोद्देश व्यक्त होतो. ज्या ज्ञानाच्या प्रकाशामुळे युरोप हा अंधकारमय मध्ययुगातून जागा झाला ते ज्ञान भारतालाही प्राप्त होणे जरूर आहे, त्यायोगेच येथील बौद्धिक व मानसिक अवनती संपून पुनरुज्जीवन ( Renaissance ) सुरू होईल. नव्या ज्ञानाचा प्रकाश येथील लोकांना लोकभाषेतून मिळावा म्हणून








त्यांनी 'भाषांतर' मासिक सुरू केले. भाषांतर मासिक लवकर बंद पडले. परंतु त्यामुळे राजवाडे यांच्या पुनरुज्जीवनाच्या किंवा नवजीवनाच्या प्रयत्नांना खंड पडला नाही. त्यांनी त्याकरिता इतिहासविद्येचा आश्रय केला. १४ व्या शतकातील युरोपच्या पुनरुज्जीवनापेक्षा १९ व्या शतकातील भारतीय पुनरुज्जीवनाची पार्श्वभूमि अत्यंत निराळी दिसल्यामुळे राजवाडे यांनी त्याला ऐतिहासिक जाणीवेचे अधिष्ठान पाहिजे असे निश्चित केले. कारण हा देश परकीय राजसत्तेने जिंकलेला असल्यामुळे त्याच्या पराभूत मनोवृत्तीला अस्मितेची व आत्मस्मृतीची आवश्यकता होती. म्हणून इतिहासविद्येच्या स्थापनेची गरज निर्माण झाली. परंतु या अस्मितेच्या जाणिवेबरोबर बुद्धिवादी अशा आधुनिक वैज्ञानिक संस्कृतीचेही बल प्राप्त करून घेणे आवश्यक झाले. राजवाडे यांनी आपल्या इतिहासमीमांसेत भारत पाश्चात्यांनी कसा जिंकला व भारत त्यांच्यापुढे का पराभूत झाला यासंबंधी कार्यकारणभाव सांगताना पाश्चात्यांची संस्कृति ही भारतीय हिंदूपेक्षा अधिक प्रगत अतएव अधिक समर्थ होती हे सांगितले आहे. याचा अर्थ असा की भारतीयांना स्वाभिमान व वैज्ञानिक संस्कृति या दोन्ही गोष्टीचा लाभ झाल्याशिवाय भारतात नवजीवन येणार नाही असा सिद्धांत राजवाडे यांनी सूचित केला या ऐतिहासिक चिंतनाने मराठी भाषेत नवजीवनाचे बीजच रोवले.

मराठ्यांचा इतिहास, मराठी भाषेचे व संस्कृतचे ऐतिहासिक व्याकरण, जुन्या मराठी वाङ्मयाचा इतिहास व भारतीय वा हिंदु समाजाच्या इतिहासाची समाजशास्त्रीय मीमांसा या संबंधात इतिहाससंशोधक राजवाडे यांचे संशोधनमय लेखन व त्यांनी संपादित केलेले ग्रंथ याचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. मराठ्यांच्या इतिहासाची साधने त्यांनी गोळा करून प्रसिद्ध केली किंवा मराठी वाङ्मयाची मध्ययुगीन ग्रंथसंपत्ती व अनेक ग्रंथकार परिश्रमपूर्वक शोधून प्रकाशात आणले एवढीच त्यांची इतिहासक्षेत्रातील कामगिरी नाही, तर त्यांनी इतिहासाची आधुनिक तत्वदर्शने, समाजशास्त्रीय विविध विचारप्रणाल्या आणि भाषाशास्त्र यांचेही चिरकाल मनन करून त्यासंबंधी स्वतःचे सिद्धांत रचले व भारतीय समाजेतिहास व भाषेतिहास याना ते सिद्धांत लागू करून काही महत्त्वाच्या निर्णयाप्रत ते येऊन पोचले. त्याकरिता त्यांनी ग्रीस, रोम, मध्ययुगीन व आधुनिक युरोप, याचे जे सुप्रसिद्ध इतिहास व जागतिक इतिहास प्रथितयश ग्रंथकारांनी लिहिले त्याचाही व्यापक व्यासंग केला होता.

## राजवाडे याची ज्ञानसाधना

राजवाडे लेखनकार्याचा तपशील पुढील प्रकारचा आहे. राजवाडे यांच्या सन १८९० ते १९२६ पर्यंतच्या प्रौढावस्थेतील कालात भारतीय व विशेषतः महाराष्ट्रीय आधुनिक पंडितांच्या लेखनात व चर्चेत जे ऐतिहासिक मुद्दे उपस्थित होत होते व त्यासंबंधी जी लेखन–भाषणात्मक चळवळ चालू होती त्या मुद्यांना व वैचारिक चळवळीला धरून राजवाडे आपले संशोधन व मनन करीत व संशोधनाचे व मननाचे फलित लेखन रूपाने वेळेवेळी प्रसिद्ध करीत असत. कॉलेजमध्ये शिकत असतानाच प्रथम त्यानी प्लेटोच्या ( Republic ) गणराज्याचे मराठी भाषांतर केले. पाश्चात्य विद्या व भारतीय प्राचीन विद्या मराठीत अवतरल्या तरच मराठी भाषा उन्नत असे ज्ञानसाधन बनेल; म्हणून भाषांतरास अग्रस्थान प्रथम देणे जरूर आहे; असे त्याना दिसले. त्याप्रमाणे त्यानी सन १८९४ च्या जानेवारीत 'भाषांतर' मासिक प्रकाशित करण्यास प्रारंभ केला. हे ३७ आठवडे चालले व पुण्यात सन १८९७ मध्ये प्लेगाचा प्रादुर्भाव झाल्यामुळे बंद पडले. सन १८९८–१९२६ च्या अवधीत त्यांनी आपल्या जीवितोद्देशातील महत्त्वाचे कार्य म्हणून 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या संग्रहाची २२ खंडे ( सुमारे ११ सहस्र पृष्ठे ) प्रसिद्ध केली. या बावीस खंडांपैकी १–६,८ या खंडांना आणि १० व ११ या खंडाना त्यांनी ऐतिहासिक विवेचनात्मक निबंध या स्वरूपाच्या प्रस्तावना लिहिल्या आहेत. त्यातील १, ३, ४, ६, ८ या महत्वाच्या असून पहिल्या खंडाची प्रस्तावना ही सर्वात मोठी म्हणजे १२३ पृष्ठांची आहे, त्यामध्ये मराठ्यांच्या इतिहासाचे काही महत्वाचे प्रश्न उपस्थित करून उलगडून दाखविले आहेत, त्याचप्रमाणे स्वतःचा इतिहासदर्शनाचा मौलिक दृष्टिकोणही मांडला आहे. या प्रथमखंडाच्या प्रस्तावनेने राजवाडे यांची महाराष्ट्रीय सुशिक्षितात खूप प्रशंसा झाली व त्यांना थोर इतिहासचिंतक म्हणून प्रतिष्ठा










प्राप्त झाली. ही त्यांची प्रतिष्ठा शेवटपर्यंत केवळ टिकली एवढेच नाही तर लेखनकार्याच्या वाढीबरोबर ती वाढत गेली. तिचे अनेक तेजस्वी पैलू प्रकट होत गेले. मराठीमध्ये त्यांच्या समयी जी महत्वाची वैचारिक विषयाला स्थान देणारी मासिके वा नियतकालिके होती त्यामध्ये म्हणजे विश्ववृत्त, ग्रंथमाला, सरस्वती मंदिर, प्राची प्रभा, इतिहास व ऐतिहासिक, रामदास व रामदासी, केसरी, भारतेतिहास संशोधक मंडळाचे वार्षिक संशोधनवृत्त इत्यादिकांमध्ये मधून मधून लेख प्रसिद्ध करीत. त्यातून त्यांचे अनेक मोठे निबंधही आले आहेत. महाराष्ट्राचा वसाहतकाल हा ग्रंथ इतिहास व ऐतिहासिक मासिकात खंडशः प्रसिद्ध झाला. 'तिङन्त विचार' हा मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणावरील निबंध 'प्राची प्रभा' या मासिकात प्रसिद्ध झाला. त्यांचा 'सुबन्त विचार' हा निबंध भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे या संस्थेने; संस्कृत भाषेचा उलगडा हा निबंध स्वतंत्र पुस्तक म्हणून सत्कार्योत्तेजक सभा, धुळे या संस्थेने व मराठी धातुकोश हा मराठी ३० सहस्र धातूंच्या निरुक्तावरील ग्रंथ धुळे येथील राजवाडे संशोधन मंदिराने प्रसिद्ध केला आहे. सन १९०३ साली ग्रंथमाला मासिकाच्या संपादकांनी राजवाडे यांचा त्या समयापर्यंत प्रसिद्ध झालेल्या लेखांचा 'संकीर्ण लेखसंग्रह' प्रकाशित केला. राजवाडे यांच्या निधनानंतर त्यांनी ग्रंथांच्या प्रस्तावना म्हणून किंवा स्वतंत्र लेख म्हणून जे काही लेखनकार्य केले त्याचा संपूर्ण संग्रह तीन खंडात मिळून चित्रशाळा, पुणे या संस्थेने प्रसिद्ध करून प्रशंसनीय कामगिरी केली आहे. या तीन भागांच्या संग्रहाशिवाय आणि वर निर्दिष्ट केलेल्या लेखनकार्याव्यतिरिक्त अत्यंत चिरस्थायी महत्त्वाचे राजवाडे यांचे निबंध म्हणजे राधामाधवविलासचंपू व महिकावतीची बखर यांच्या प्रस्तावना होत या प्रस्तावना म्हणजे भारताच्या व महाराष्ट्राच्या इतिहासाचे गंभीर तत्त्वचिंतनच होय; त्यांचे वैचारिक मूल्य मोठे आहे.

मराठ्यांच्या इतिहास साधनांची जुळवाजुळव करण्याकरिता राजवाडे यांनी आपले सर्व आयुष्य वाहिले. राजवाडे यांचे असे मत होते की, भारताचा व महाराष्ट्राचा शास्त्रशुद्ध इतिहास उपलब्ध होण्याकरिता इंग्लिश इतिहासकारांवर अवलंबून राहणे धोक्याचे आहे. त्यांनी लिहिलेला इतिहास हा बहुशः जेत्यांच्या दृष्टीकोणातून लिहिलेला जिताचा इतिहास असण्याचा संभवच फार; आपला इतिहास शास्त्रशुद्ध, निःपक्षपाती व पूर्वग्रहशून्य मनाने लिहिला जावा व तो तथ्य (Facts) निष्ठ प्रमाणावर आधारला जावा; अशा इतिहासानेच राष्ट्राला आत्मस्मृति लाभेल; म्हणून ऐतिहासिक प्रमाणांची जुळणी करणे हे इतिहासकारांचे प्रथम कर्तव्य होय; त्याकरिता अनेक इतिहासकारांनी जन्मभर तपःसाधनाच करणे आवश्यक आहे अशी त्याची श्रद्धा होती.

अशी श्रद्धा त्याच्या ठिकाणी तारुण्यात, विद्यार्थी दशेतच उत्पन्न झाली. त्यानंतर त्यानी आपले सर्व जीवित इतिहासाच्या ज्ञानमय तपात व्यतीत केले. इ. सन १८९५-१९२६ पर्यंत, अंतकालापर्यंत, लोकनिरीक्षणार्थ व इतिहास साधनांचा शोध करण्याकरिता भारताची व विशेषतः मराठी भाषिक प्रदेशाची निरंतर यात्रा करीत ते राहिले. ही यात्रा त्यांनी अनिकेत बनून परंतु स्थिरमतीने केली. गृहस्थाश्रमाचा बंध म्हणजे पत्नी; २७ वर्षे वय होण्याच्या आत त्यांच्या पत्नी निधन पावल्या. नंतर ते परिव्राजक म्हणजे चिरयात्रिक बनले; इतिहासात व पुराणात वर्णिलेली स्थळे पहात हिंडले. त्यातील काही इतिहासदृष्ट्या महत्वपूर्ण वाटणाऱ्या स्थलांची वारंवार दर्शने घेतली. प्रांत, ग्रामे, नगरे, सरोवरे, नद्या, पर्वत, गड व गढ्या पाहिल्या. हे अवलोकन करताना इतिहासवर्णित घटनांची त्या स्थलकालाशी तुलना करीत इतिहासाचे मनन करीत. त्या स्थलातील किंवा प्रदेशातील जमाती, त्यांच्या चालीरीती, वाङ्मय, भाषोपभाषा, संज्ञा व उच्चार यांचा निरुक्तशास्त्र, वंशशास्त्र व समाजसंस्थाशास्त्रद्वारे छडा लावीत. प्रवासातले काही दिवस आठवडे किंवा महिने एखाद्या मुक्कामात राहून वाचन, लेखन व मनन याकरिता काढीत.

अशा मुक्कामात ऐतिहासिक कागदपत्रे किंवा हस्तलिखित पोथ्यापुस्तके यांचा संग्रह कोणाकडे आहे काय त्याची चवकशी करून तो मिळविण्याची खटपट करीत व मिळाल्यावर महत्त्वाचे लिखाण हाती आले की त्यावर बुभुक्षितप्रमाणे तुटून पडत. मालकाची खुषी असली व त्यामुळे तो संग्रह अन्यत्र सोयीच्या स्थळी अध्ययनार्थ व संग्रहार्थ नेण्यास मिळाला तर तिकडे

न्यावयाचा. जर तितकी खुषी नसली तर मालकाच्या मर्जीप्रमाणे त्याच गावी मुक्काम ठोकून वाचन, तर्जुमा इत्यादि कामे करावयाची. राजवाडे यांची मनःप्रकृति दुर्वासमुनीप्रमाणे होती हे सर्वत्र प्रसिद्ध आहे. परंतु इतिहाससाधनांचा लाभ ज्याच्याकडून होण्याची शक्यता असे त्याच्याशी त्यांचे वर्तन पुष्कळदा विनयशील किंवा निदान संयमी असावयाचे. नवी कागदपत्रे किंवा वैशिष्ट्यपूर्ण असे अन्यप्रकारचे लिखाण हाती पडल्याबरोबर त्यांच्या वाचनात व प्रतिलीपि करण्यात देहभान विसरून त्याचे अहोरात्र काम चालावयाचे. मितविदा व मित आहारविहार असावयाचे. दुपारी एकदाच २ किंवा ३ वाजता स्वहस्तानेच बहुशः पाकसिद्धि करून दूधभातासारखा सात्विक आहार घेत. रात्री फलाहार किंवा दूध घेत. स्वच्छतेची फार काळजी घेत. एकच लहानसे व्यसन होते. ते म्हणजे विडी. कित्येकदा चार पांच विड्याही एकदम शिलगावून पीत बसत व धुराच्या वलयाकडे मंद नजर टाकीत ऐतिहासिक प्रश्नाच्या चिंतनात निमग्न होत.

हस्तलिखिताची दप्तरे तपासताना खूप कष्टही पडत. स्वच्छ व व्यवस्थित रीतीने ठेवलेली दप्तरे त्यांना फार थोड्या ठिकाणी आढळली. बऱ्याच ठिकाणी मालक दप्तरे दाखविण्यास नाराज असत. त्यांना राजी करण्याकरिता खटपट करावी लागे- लागेबांधे किंवा वजनदार माणसाचे दडपण याचा उपयोग करणे भाग पडे. त्यात पुनः दप्तरे पाहावयास मिळाली तरी तर्जुमा करण्यास किंवा योग्य ठिकाणी संग्रह करण्याकरिता नेण्यास पुष्कळच आर्जवे करावी लागत. प्रथम पुष्कळदा दप्तरे सुरक्षित नसावयाची. अडगळीच्या माडीत जळया-जळमटी भरलेल्या जागेत अस्ताव्यस्तरीतीने टाकलेल्या राशीत पडलेली असावयाची. त्यावर पाऊस गळून कित्येक दप्तरांचा कागद एकमेकास चिकटून कागदपत्रांच्या विटाच बनलेल्या असावयाच्या. अक्षरे व ओळी ओघळ जाऊन अस्पष्ट झालेल्या स्थितीत असायची, किंवा उंदीर व बागुर्डे यानी खराबी केलेली किंवा कसरीनी अर्धवट नष्ट झालेली कागदपत्रे असावयाची. अशा स्थितीत कसलाही निर्वेध उत्पन्न होऊ न देता शांतपणे बिनतक्रार त्या कागदपत्रांची नीट जुळणी करून व साफसफाई करून त्यांचे अध्ययन करून विल्हेवाट लावीत. असे हे तप ३५-४० वर्षे राजवाडे यानी केले आणि मराठी भाषेत इतिहासाची साधने सिद्ध केली. असे अविश्रांत श्रम करीत असता अडचणी व संकटेही आली परंतु त्यांना तोंड देऊन अधिक उत्साहाने कामे केली.

उदाहरण म्हणून प्रथम खंडाच्या संपादनाची हकीगत ध्यानात ठेवण्यासारखी आहे. त्यांच्या इतिहाससाधनाच्या संशोधनास खरा प्रारंभ वाई प्रांतीच झाला. वाई येथील श्री. एरंडे यांच्या वाड्यात पानिपतच्या संग्रामाच्या काळातील कागदपत्रांचा कातडी पेटीत सुरक्षित ठेवलेला व अव्वल दर्जाच्या प्रमाणानी भरलेला असा संग्रह त्यांच्या हाती लागला. इतिहाससाधनांचा प्रथम खंड त्यावरूनच त्यानी तयार केला. तो खंड पुणे येथे फडकेवाड्यातील विठ्ठल छापखान्यात छापला. परंतु त्या छापखान्यास आग लागून तो जळला व त्याबरोबर प्रथम खंडाची पुस्तकेही भस्मसात झाली. पुनः तोच खंड त्यांनी स्वहस्ताने लिहून काढला. त्याकरिता खूप काम करून दप्तरे पुनः तपासावी लागली. तेव्हा एक मित्र त्यांना म्हणाले की तुम्ही इतके श्रम करून जीवाला फार ताप करून घेता. त्यांनी त्यावर उत्तर दिले की, 'माणूस काम करून मरत नाही आळसाने मरतो.' प्रथम खंडाच्या प्रस्तावनेत त्यांनी पानिपतच्या संग्रामात झालेल्या मराठ्यांच्या पराभवाची मीमांसा केली. नंतर त्यांनी वाईच्या जवळ मेणवली येथील नाना फडणविसांचे दप्तर रात्रंदिवस काम करून तपासले. नंतर वाईजवळील ओझर्डे येथील मोंगलांचे देशमुख सूर्याजी पिसाळ यांच्या दप्तराचे अध्ययन केले. त्या संबंधात लिहिताना त्यांनी, सूर्याजी पिसाळावर तो मोंगलांच्या बाजूचा व मराठी लोकांचा गनीम (शत्रु) म्हणून उल्लेख करणारा म्हणून टीकेची झोड उठविली. त्यामुळे ते ओझर्डेदप्तर राजवाडे यांना नाराज होऊन मालकांनी दिले नाही.

राजवाडे यांनी कागदपत्रांच्या रूपाने जेवढी इतिहाससाधने प्रसिद्ध केली त्यापेक्षा अधिक मोठा अप्रकाशित असा संग्रह त्यांच्यापाशी राहिला. त्यातील काही अंश त्यांनीच पुणे येथे सन १९१० मध्ये स्वतः स्थापन केलेल्या 'भारत इतिहास संशोधन मंडळ' या संस्थेत ठेवला. नंतरच्या संग्रहाचा अंश त्यांच्या स्मरणार्थ त्यांच्या निधनानंतर स्थापन झालेल्या धुळे येथील 'राजवाडे' संशोधक मंडळ, या संस्थेत ठेवलेला आहे.











मराठी व संस्कृत भाषा, यांचे व्याकरण व हिंदू समाज या संबंधातील त्याचे संशोधन असेच महत्वाचे आहे. महाराष्ट्रात व पंजाबात प्रसिद्ध असलेल्या महानुभाव संप्रदायाचे मराठी वाङ्मय हे मराठीतील सर्वात प्राचीन वाङ्मय होय. हे वाङ्मय अनेक गुप्त सांकेतिक लिपिमध्ये लिहिले आहे. त्या लिपीचा उलगडा राजवाडे यांनी प्रथम स्वबुद्धीने केला व त्या वाङ्मयाचे द्वार खुले केले. ज्ञानेश्वरीची एकनाथ पूर्वीची प्रत राजवाडे यांनीच प्रथम हुडकून काढून व तिचे व्याकरण काढले व हेच ज्ञानेश्वरकालीन मराठीचे व्याकरण होय हे सिद्ध केले. त्यामुळे त्यांच्या संशोधक प्रतिभेचा प्रकाश अधिक उज्वल दिसू लागला. मुकुंदराज, मुक्तेश्वर, दासोपंत, रघुनाथ पंडित, जनीजनार्दन, शिवदिन केसरी इत्यादि मध्ययुगीन साहित्यकारांचे व संतांचे वाङ्मय, वंशावळी व काळ याच्या संबंधी महत्वाचे शोध राजवाडे यांनीच प्रथम लावले. तात्पर्य, मध्ययुगीन मराठी वाङ्मय व मराठी राज्य यांच्या संबंधाच्या संशोधनकार्यात राजवाडे यांचे अद्वितीय महत्व मान्य करावे लागते.

## राजवाड्यांच्या मते इतिहास म्हणजे काय ?

राजवाडे यांची इतिहासाची कल्पना विज्ञाननिष्ठ व जीवनव्यापी आहे. मानवाच्या सार्वदेशिक व सार्वकालिक स्थित्यंतरांचा समावेश करणाऱ्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाचा संपूर्ण अर्थ त्यांच्या इतिहासकल्पनेत समाविष्ट केलेला आहे. त्यांनी आपली इतिहासाची ही व्यापक कल्पना पाश्चात्य इतिहासज्ञ पंडितांच्या सर्व विवेचनाचे मंथन करून निर्माण केली आहे. ' मराठ्यांच्या इतिहासाची साधने ' खंड ६ च्या प्रस्तावनेत त्यानी इतिहासविषयक महत्वाच्या पाश्चात्य कल्पनांची साधकबाधक चर्चा केली आहे. या चर्चेचे सार त्यानी ' विद्यासेवक ' मासिकातील ( वर्ष १ अंक ७ ) ' भारतीय इतिहासाची मूलतत्त्वे ' या लेखात इतिहासाच्या लक्षणात सांगितले आहे असे म्हणता येईल. ते लक्षण असे– " इतिहास शब्दाचे दोन अर्थ आहेत. ( १ ) गतकाली होऊन गेलेल्या कृत्यांच्या परंपरित वर्णनालाही इतिहास हा शब्द लावतात. कृत्ये व त्यांची वर्णने या दोहोंचा वाचक एकच शब्द आहे. पैकी कृत्यपरंपरावाचक जो इतिहास शब्द तो येथे इष्ट समजावा. इतिहासाची मूलतत्वे म्हणजे कृत्यपरंपरेची मूल कारणे. मूलकारणे दोन प्रकारची, बाह्य व आंतर. मनुष्याच्या पिंडावर बाह्य सृष्टीचे आघात होतात. आघातांचे सातत्य होऊन मनोरचना बनते. सृष्टी ही मनोरचनेचे ऊर्फ स्वभावाचे बाह्य कारण होये आणि कृत्यरूपाने फलद्रूप होणारा स्वभाव कृत्यांचे आंतर कारण ठरते. "

ही इतिहासाची व्याख्या वैज्ञानिक आहे, गूढवादास बाजूला सारणारी आहे. या इतिहासाच्या व्याख्येत परिस्थिती व मानव यांच्या द्वंद्वावर आधारलेली ऐतिहासिक प्रक्रिया आहे. यात दैवी संकेत किंवा दिव्य व वीर विभूतींचे कर्तृत्व किंवा भौगोलिक कारणे किंवा आर्थिक, राजकीय वा अन्य प्रकारची सामाजिक शक्ती किंवा विशिष्ट वंशाचे वा राष्ट्राचे जन्मसिद्ध सामर्थ्य किंवा इतिहासाची अबाधित गति किंवा युगप्रेरणा इत्यादि कोणते तरी एक कारण इतिहासाला प्रेरणा देऊन त्याची दिशा, उन्नति, अवनति, व परिणति ठरविते असे सांगणाऱ्या विविध ऐतिहासिक उपपत्तींना राजवाडे यानी कमी महत्व दिले आहे. या व्याख्येत व्यक्त झालेल्या विज्ञाननिष्ठ दृष्टीकोणाला धरूनच प्रथमपासून इतिहास संशोधनास राजवाडे प्रवृत्त झाले. राजवाडे यांच्यावर मुख्यतः प्लेटो, हेगेल व कांत (Comte) ह्या तत्वज्ञांच्या विचारांची छाप पडली होती. त्यामध्ये त्यांनी कॉतने मांडलेली मानवी समाजाच्या वैचारिक विकासाची क्रमिक सोपानपरंपरा मुख्यतः मान्य केली होती. धार्मिक (Religious), आध्यात्मिक (Metaphysical) व वैज्ञानिक ( Scientific ) या तीन श्रेणीत वैज्ञानिक अवस्था सर्वोच्च होय हे त्याना मान्य झाले होते. उदाहरणार्थ, ' विकार–विचार प्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांति ' या निबंधात त्यांनी धार्मिक कल्पना, धार्मिक ग्रंथ वा धार्मिक कला याना भ्रमाधिष्ठित म्हणून निर्दिष्ट केले आहे. त्याचप्रमाणे सहाव्या खंडाच्या प्रस्तावनेत तत्वज्ञान हे स्वैर कल्पनांचा खेळ असल्यामुळे कालांतराने मानवी ज्ञानाची उत्कृष्ट वाढ होऊन विज्ञानच तत्वज्ञानाचा प्रांत आक्रमून टाकील व पारमार्थिक तत्वज्ञानाचा पदोपदी पराभव होईल असेही त्यांनी भविष्य वर्तविले आहे. त्यामुळे वैज्ञानिक किंवा भौक्तिकवादी (Positivist) इतिहासोपपत्तिच सर्वथा ग्राह्य म्हणून त्यांनी मान्य केली. ' मराठ्यांच्या इति-








हासाची साधने' खंड– १ च्या प्रस्तावनेत त्यांनी 'ऐतिहासिक प्रसंग' म्हणजे काय यांचे जे स्पष्टीकरण केले आहे ते या व्याख्येस धरून आहे. तेथे ते म्हणतात, "मानवी इतिहास काल व स्थल यांनी बद्ध झालेला आहे. कोणत्याही प्रसंगाचे वर्णन द्यावयाचे म्हटले म्हणजे त्या प्रसंगाचा परिष्कार विशिष्ट कालावर व विशिष्ट स्थलावर पसरवून दाखविला पाहिजे. प्रसंगाचा परिष्कार कालाने व स्थलाने विशिष्ट कसा झाला आहे, हे दाखविताना त्या काली व स्थळी कोणत्या व्यक्ती प्रामुख्याने पुढे येतात, हेही इतिहासकाराला स्वाभाविकपणेच सांगावे लागते. सारांश, काल, स्थल व व्यक्ति या त्रयींची जी सांगड तिलाच प्रसंग व ऐतिहासिक प्रसंग अशी संज्ञा देता येते." (राजवाडे, लेखसंग्रह पृ. ३०). येथे इतिहासाच्या मुळाशी समाज हा न धरता, व्यक्ति ही मूलभूत धरली आहे. म्हणजे इतिहास हा मानव-व्यक्तींनी घडविलेला असतो, हा सिद्धांत गृहीत धरला आहे. व्यक्ती ही मूलभूत धरून समाज म्हणजे व्यक्ति-समुदाय असा अर्थ करतात व समाजेतिहासाचा अर्थ सांगतात: "लहान व्यक्तींची चरित्रे व मोठ्या व्यक्तींची चरित्रे मिळून समाजाचा संपूर्ण इतिहास होतो. समाजात मोठ्या व्यक्ती केव्हाही थोड्या असल्यामुळे मोठ्या व्यक्तींच्या इतिहासाला लहान व्यक्तींच्या म्हणजे बहुजनसमाजाच्या इतिहासाचा जोड द्यावा लागतो. केवळ मोठमोठ्या व्यक्तींच्याच चरित्राने समाजाचा इतिहास संपूर्ण होत नाही." (पृ. ३१)

इतिहासाची अशा प्रकारची भौतिकवादी व्याख्या स्वीकारल्यावर समाज म्हणजे व्यक्तिसमुदाय, असा अर्थ करावा लागतो. व्यक्ति ही मूलभूत घटक धरून इतिहासमीमांसेस प्रारंभ केला तरी त्या मूलघटकापाशी थांबून भागत नाही. त्या मीमांसेचा विस्तार करण्यास व्यक्तिसमुदायांचे भिन्न भिन्न प्रकार हेही ध्यानात धरावे लागतात. समाजातील भिन्न भिन्न कर्मे व त्या कर्मांकरिता आवश्यक अशा भिन्न भिन्न प्रकारच्या मानवीसंघटना समजावून घेतल्या तरच इतिहास म्हणजे काय याचा उलगडा होऊ शकतो. संस्था व संस्थेची कर्मे यांच्याशी इतिहासाचे मुख्य कर्तव्य आहे ही गोष्ट राजवाडे यांनी मान्य केली आहे. 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' खंड ६ च्या प्रस्तावनेत संस्था म्हणजे शरीर होय अशी ते रूपकात्मक परिभाषा वापरून म्हणतात: "वासना– यंत्रणा व साधना किंवा इच्छा– शरीर व कर्म अशी मानवसमाजाच्या चळवळीची त्रिविध परंपरा आहे. या त्रिविध परंपरेची हकीकत देणे म्हणजेच इतिहास लिहिणे होय. कोणत्या वासनेकरिता संस्थायंत्राचे कोणते इंद्रिय निर्माण झाले, त्या इंद्रियाने इष्टकार्य कितपत होते व ते इंद्रिय सबंध यंत्राच्या अनुरोधाने चालते किंवा प्रतिरोधाने चालते ही हकीकत देण्याचे काम शरीरकपद्धतीचे असते. वस्तुतः पाहता संस्थांच्या शरीरांपेक्षा शरीराच्या द्वारा झालेले जे काम त्याच्याशी इतिहासाचे मुख्य कर्तव्य आहे. परंतु काम सिद्ध व्हावयाला शरीराची अपेक्षा असल्यामुळे व शरीराच्या सिध्यर्थ समाजाची झटपटही विशेष असल्यामुळे किंबहुना शरीराची रचना व सुधारणा हेच काही काल किंवा सर्वकाल राष्ट्राचे मुख्य कर्तव्य होऊन बसल्यामुळे शरीर, शरीररचना व शरीरसुधारणा हाच इतिहासाचा मुख्य विषय होऊन बसला आहे. ... वासनेचा निर्देश केल्यावाचून शरीर का निर्माण झाले ते सांगता येत नाही व कार्याचा निर्देश केल्यावाचून शरीराची लक्षणेही ठरविता येत नाहीत. ही अडचण लक्षात घेऊन शरीरक म्हणून एकच पद्धती मी स्वीकारली आहे." (ऐतिहासिक प्रस्तावना पृ. २२८–२९).

राजवाडे यांच्या दृष्टीने इतिहासाचा निश्चित अर्थ कोणता याची अशी रूपरेखा आहे. असा इतिहास पूर्वग्रहरहित व प्रामाणिकपणे लिहिण्याचा प्रयत्न करणे आवश्यक आहे असे ते वारंवार सांगतात. ते म्हणतात: "निर्लेप व निरहंकारपणाने इतिहासाचा विचार करावयाला लागणे ही इतिहासाचे खरे स्वरूप जाणण्याच्या मार्गाला लागण्याची पहिली पायरी आहे. ह्या मार्गाला लागण्याची दुसरी पायरी सर्व प्रकारचे अर्धवट ग्रह सोडून देणे ही होय" (ऐतिहासिक प्रस्तावना पृ. १३२). परंतु यासंबंधी ते निराशेचे उद्गार काढतात– "वर्तमानक्षणाच्या पाठीमागील गतकाळी पृथ्वीवरील नव्या व जुन्या दरोबस्त सर्व समाजांच्या सर्व तऱ्हेच्या उलाढालींची जी साद्यंत व विश्वसनीय हकीगत ती इतिहास होय. असला साद्यंत व विश्वसनीय इतिहास पृथ्वीवरील कोणत्याही भाषेत अद्यापपर्यंत लिहिला गेला नाही. ... प्रत्येकाचा इतिहास त्याच्या त्याच्या








स्वदेशाभिमानाच्या रंगाने चितारला गेल्यामुळे इतर देशातील इतिहासज्ञांच्या पसंतीस सहजच उतरत नाही. जो तो आपआपला देश त्रिभुवनाचा केंद्र समजून तत्प्रवण सर्व देशांची चरित्रे होत आहेत असे चित्र काढण्याचा, निःपक्षपातीपणाची प्रतिज्ञा करूनही, प्रयत्न करीत असतो. ह्या स्वदेशाभिमानाखेरीज प्रत्येकाचे काहीना काही तरी वैयक्तिक खूळ असतेच. कोणी केवळ भौगोलिकदृष्ट्या, कोणी केवळ काळदृष्ट्या, कोणी निवळ व्यापारीदृष्ट्या, व कोणी स्वदेशसंस्कृती-दृष्ट्या जगाच्या इतिहासाची अजमावणी करीत असतात.... असा प्रकार असल्यामुळे समाजाच्या चरित्राचे खरे स्वरूप काय, त्याचे केंद्र कोठे आहे, ते प्रागतिक आहे. किंवा अधोगतिक आहे किंवा स्तब्ध आहे, वगैरे प्रश्नांचा जसा समाधानकारक निकाल लागावा तसा लागत नाही. वैयक्तिक मते बाजूला सारून व स्वदेशाभिमानाचा दर्प बाजूला ठेवून हे काम केले तरच शुद्ध व विमल तत्त्व हस्तगत होण्याचा संभव आहे." (ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ३१२)

परंतु अशा प्रकारे पूर्वग्रहमुक्त मन असलेला इतिहासकार कोठे मिळणार ? निर्लेप व निरंजन होऊन इतिहासाचा विचार करणे दुर्घट आहे. झाडून सर्व पूर्वग्रह टाकून देणे मनुष्यस्वभावाला निसर्गतः अशक्यप्राय आहे. सांस्कृतिक संप्रदायाच्या परिसरात मानवी मन बाल्यापासून वाढत असते. मनुष्य बाल्यात स्वसमाजाची भाषा जशी साहजिक आत्मसात करतो त्याप्रमाणे स्वसमाजाच्या इष्टानिष्टत्वाच्या भावना, परंपरेसंबंधी अभिमान, अभिरुची इत्यादि सर्व काही आत्मीय बनवितो. ह्या सर्व मानसिक बनावांच्या अनुरोधाने सत्यासत्य व सारासार ठरविणारी स्वाभाविक बुद्धि विवेक व निर्णय करू लागते. म्हणून प्रत्येक समाजाची, कालाची व व्यक्तीची जगाच्या व स्वतःच्या इतिहासाकडे पाहण्याची तऱ्हा एकसारखी असणे कठिण आहे. ही गोष्ट राजवाडे यानी लक्षात घेतली आहे. ते म्हणतात : " ह्या भिन्न दृष्टीचा परिणाम असा होतो की एका काळी व एका समाजाला जी विधाने सिद्धांतवत् भासतात तीच दुसऱ्या काळी दुसऱ्या समाजाच्या अश्रद्धेचे विषय होतात. ह्या विरोधाचे कारण असे आहे की विकार व विचार यानी खळबळून जाणाऱ्या व्यक्तींशी व समाजाशी मानवइतिहासाला कर्तव्य असते. ज्या निर्विकार दृष्टीने दगडाकडे किंवा वनस्पतीकडे मनुष्य पाहू शकतो, तिचा उपयोग मनुष्यसमाजावर करता येत नाही. कारण निर्विकार दृष्टीचा उपयोग करू पाहणारी व्यक्ति स्वतः विकारवश असते; व ज्या समाजांवर दृष्टीचा प्रयोग करावयाचा ते समाजही विकारवश असतात." (ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ३१६).

इतिहासविषयक विवेचनात ह्या महत्वाच्या अडचणीबरोबर दुसरी एक महत्वाची अडचण उभी असते, ती म्हणजे इतिहासातील घटनांच्या मूल्यमापनासंबंधी होय. अमुक एक ऐतिहासिक कृत्य, विधि, निषेध, संस्था, चाल, प्रवृत्ति, अधम की उत्तम, हितकारक की अहितकारक, प्रगत की अप्रगत, इत्यादि प्रश्न मूल्यमापनात अन्तर्भूत होतात. यासंबंधी राजवाडे यांचे मत असे आहे की मूल्यमापन हे इतिहासकाराचे उद्दिष्ट किंवा प्रयोजन नाही; कारण मूल्यमापन हे नीतिशास्त्राशी संलग्न कार्य आहे. परंतु नीतिशास्त्र हे शाश्वत निकष देण्यास असमर्थ आहे; कारण ते विशिष्ट देशकालाशी सापेक्ष असते ते म्हणतात– "मानवसमाजाची हकीकत देताना संस्थांचे किंवा कृत्यांचे अधमोत्तमत्व ठरविण्याला स्थिर मान असू शकत नाही. असू शकते, असे म्हणणे म्हणजे एका पूर्वग्रहाचाच आश्रय करणे आहे. आणि पूर्वग्रहाचाच आश्रय करणे म्हणजे इतिहासाच्या सशास्त्र परिशीलनाला सर्वस्वी घातक आहे. बरे, वाईट; शुभ, अशुभ वगैरे नीतिशास्त्रातले जे अर्थ आहेत ते गृहीत धरून ऐतिहासिक प्रसंगाचा, समाजाची व संस्थांची परीक्षा करणे म्हणजे ठराव नीतिशास्त्रातल्या अर्थाच्या पलीकडे जाण्यात मानवसमाजाला अटकाव करण्यासारखेच आहे...... तात्पर्य प्रगति झालेली आहे किंवा अधोगति झालेली आहे हे पाहण्याचे काम नीतिशास्त्राचे आहे, इतिहासाचे नाही.

सूक्ष्मतेने पहाता, निर्भेळ इतिहास म्हणून ज्याला म्हणता येईल त्याचे काम फक्त झालेल्या प्रसंगाची विश्वसनीय हकीकत देण्याचे आहे. कालाचे पौर्वापर्य लावून व प्रसंगाचे कार्यकारणत्व सिद्ध करून मृत गोष्टी अशा अशा सातत्याने झाल्या इतके सांगितले म्हणजे इतिहासाची कामगिरी आटोपली "; ' इतिहास भूतवृत्ताचा विश्वसनीय सारांश देतो व नीतिशास्त्र त्याचे






उत्तमाधमत्व ठरविते. ...... निःपक्षपाताने काढिलेला सारांश मात्र, यावच्चन्द्र दिवाकरौ अजरामर राहतो. ” ( ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ३१७,१८ ).

या प्रतिपादनाचा भावार्थ असा आहे की, राजवाडे हे, इतिहास ही विज्ञानाप्रमाणेच एक ज्ञानशाखा आहे, असे मानतात. ज्ञान शाखेचा दर्जा इतिहासास आणण्याचा प्रयत्न आधुनिक काळातच सुरू झाला. आधुनिक कालापूर्वी जगात जे इतिहास झाले त्यांचा उघड हेतु भूतवृत्तानुवाद हाच असला तरी त्याबरोबर भिन्न अन्तःस्थ हेतू दडलेले होते. विशिष्ट व्यक्ती, कुले, वंश, राष्ट्रे, संप्रदाय, प्रसंग, किंवा घटना यांचे माहात्म्य वाढविणे किंवा त्यांच्यावर क्षुद्रत्वारोप करणे हाच अन्तःस्थ हेतु इतिहास निवेदकांत वसत होता. त्यामुळे त्यात वाटेल तेथे अवास्तवाची वा अतिशयोक्तीची भर पडल्याशिवाय रहात नसे. त्याकाळी वस्तुतः काही थोड्याच वस्तुनिष्ठ दृष्टीच्या महानुभावांना सत्यकथनाची प्रेरणा लाभलेली असे. त्याकाळी इतिहास हा निर्भेळपणे वस्तुनिष्ठच असला पाहिजे, असा नियम सर्वसंमत होण्याची प्रवृत्ति समाजात नसे. अद्‌भुत व कल्पित कथांची इतिहासात भर टाकल्याने काही बिघडले आहे अशी जाणीवच त्यावेळी नव्हती. अशा पूर्वपरंपरेच्या विपरीत वातावरणातून बाहेर पडलेली इतिहासकाररीती हे या आधुनिक युगाचेच लक्षण आहे. परंतु नैतिक मूल्यमापन व इतिहास यांच्या संबंधी सापेक्ष नीतिवादाच्या आधारे राजवाडे यांनी जे प्रतिपादन केले आहे त्यातली महत्त्वाची अडचण राजवाडे यांनी ध्यानात घेतलेली दिसत नाही. ती अशी की, इतिहासाचा विषय मानवी कृत्ये हा असल्यामुळे त्यात मानवी कृत्याची सद्‌विवेकबुद्धीशी नित्यसंलग्नता ध्यानात घ्यावी लागते. मानवी विश्वच नैतिक विश्व आहे. त्याच्यासंबंधी कोणतेही विवेचन नैतिक विवेकाच्या स्पर्शापासून मुक्त असे करणे अशक्य आहे. म्हणजे मानवी ऐतिहासिक प्रसंग हा नैतिक प्रसंगच आहे; या प्रसंगाच्या कोणत्याही तथ्यकथनपर वा कार्यकारणत्व निर्णयपर इतिहासात चांगले व वाईट या कोटींचा म्हणजे नैतिक मूल्यांचा अनुकूल वा प्रतिकूल निर्देश अपरिहार्यपणेच करावा लागतो. उदाहरणार्थ स्वतः राजवाडे हेच इतिहासविवेचनात अशी सदसत् मूल्यांचा निर्णय दर्शविणारी शेकडो विधाने करताना दिसतात. उदाहरणार्थ, ‘ मराठेशाहीचा पाया घालणारा शहाजी ’; व ‘शिवाजीची गुणसंपदा’ ( पृ. १८७–२२८ ) ही या पुस्तकातील प्रकरणेच पहावी. यात गुणदोष विवेचन म्हणजे नैतिक मूल्यावर आधारलेली चर्चाच प्राधान्याने आली आहे. “१८ व्या शतकाच्या पूर्वार्धात व उत्तरार्धात मराठ्यांची ‡ ( म्ह० महाराष्ट्रीयांची ) संस्कृति युरोपातील प्रगत राष्ट्रांच्या संस्कृतीहून कमी दर्जाची होती. ( पृ. १९३ ) हे वाक्य अत्यंत मौलिक महत्त्वाचे आहे. यात सांस्कृतिक मूल्यांचा तुलनात्मक निर्णय राजवाडे यांनी जाहीर केला आहे. मराठ्यांचा पराभव ब्रिटिश का करू शकले या तथ्याच्या मुळाशी असलेले कार्यकारणत्व दाखविणे हाच राजवाडे यांचा उद्देश असला तरी त्याकरिता हिंदूंची संस्कृति युरोपियन संस्कृतीपेक्षा हीन होती हा नैतिक निर्णय करूनच हिंदूंच्या पराभवाची मीमांसा राजवाडे करू शकले. व राजवाडे यांचा शिवाजीची गुणसंपदा हा लेख शिवाजीसंबंधी नैतिक निर्णय सिद्ध करणारा आहे. समाजमनोरचनेची मीमांसा इतिहासाचा भाग आहे, असे राजवाडे मानतात; ( ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ३६१ ) त्यात नैतिक कल्पनांचा प्रामुख्याने अंतर्भाव होतो. या संबंधात हिंदूंचा इतिहास काय संदेश देतो हे राजवाडे स्वतः सांगतात– “ हिंदू लोकांची ही तात्त्विक संन्यासप्रवण मनोरचना बदलण्याचा दीर्घोद्योग केला पाहिजे अशी सल्ला इतिहासाचा हा भाग सांगतो. ” नैतिक वा कलात्मक मूल्यांचा सापेक्षतावाद मान्य केला तरी इतिहास हा मूल्यचर्चेच्या जाळ्यातून कधीही सुटणे शक्य नाही. कारण मानवी विश्वातील हालचालींचा तथ्य ( Fact ) व मूल्य ( Value ) यांचा प्रांत वेगळा करून विचार करणे अशक्य आहे. हा वदतोव्याघात किंवा स्वविरोध ( iuner contradiction ) राजवाडे यांच्या ध्यानात आला नाही.

राजवाडे यानी स्वीकारलेली ही इतिहासकल्पना पाश्चात्य इतिहासतत्त्वविचारात अत्यंत महत्त्वाची मानलेली व गाजलेली आहे. पाश्चात्य देशात गेली दोन शतके इतिहासतत्त्वाची मीमांसा सुरू आहे. इतका अत्यंत खोलात जाऊन त्यामध्ये भाग घेणारा पहिला इतिहाससंशोधक भारतीय म्हणजे राजवाडे हेच होत. म्हणून त्यांचा या संबंधातला दृष्टिकोण अत्यंत संक्षेपाने वर मांडला आहे.

‡ संपादकांच्या मते

प्रा. प्रभाकर पुजारी

# श्रीसमर्थ, छत्रपती व प्रा. फाटकांचे संशोधन

' रामदासी वादाचा परिचय ' ही लेखमाला श्री. न. र. फाटक यांनी ' नवभारता ' तून प्रसिद्ध केलेली आहे. ती वाचल्यानंतर माझ्यासारख्या आजच्या पिढीतल्या वाचकाची निराशा झाली. नव्या संशोधनाच्या प्रकाशात रामदासी वादाला उजाळा दिला जाईल किंवा निदान पूर्वीच्या वादात कोणकोणते विचार मांडले गेले त्यांची तरी ओळख होईल अशी अपेक्षा होती. रामदासी वादामागची वैचारिक भूमिका पुनः स्पष्ट करणे हे फाटकांसारख्या अग्रेसर संशोधकाचे कर्तव्य होते. ते न करता हयात नसलेल्या समर्थभक्तांचा उपहास करणे आणि आत्मप्रशंसा करणे यात बुद्धिसर्वस्व वेचण्यात फाटकांनी भूषण मानलेले आहे. संशोधनाची नवनवीन क्षेत्रे पादाक्रांत करण्याऐवजी त्यांची संशोधनबुद्धी जुन्याच मात्रा अधिक कडवटपणाने उगाळीत बसलेली आहे. आमच्या संशोधकांची संशोधनबुद्धी फारच लवकर म्हातारी बनते, क्षीण बनते. किंचित संशोधन केले व आत्मस्तुतीला लागले अशी त्यांची अवस्था होते. सर्वज्ञतेचा विकार तर जन्मजातच ! फाटकही याच परंपरेतले. आपण अगदी अंतिम सिद्धांत सांगून टाकलेले आहेत अशी त्यांची आत्मप्रौढी ! फाटक हे अलीकडे जरी ' उपहासापुरते उरलेले ' असले तरी खवटपणातच पुरुषार्थ आहे असे मानण्याएवढे आम्ही अजून म्हातारे झालो नाही. म्हणूनच शिव-समर्थभेटीविषयी जे विवेचन फाटकांनी केलेले आहे त्याचा परामर्श या लेखात घ्यावयाचा आहे.

## समर्थ-शिवाजी यांच्या भेटीविषयी —

त्या विवेचनात फाटकानी **अनेक गोष्टींचा विपर्यास** केलेला आहे, निरनिराळ्या युक्त्या योजून उघड पुराव्यांना बाजूला सारलेले आहे, समर्थ चरित्रांचा आपल्या सोयीप्रमाणे उपयोग करून घेतलेला आहे, आपल्या सवडीप्रमाणे परस्परविरोधी मते ठोकून दिलेली आहेत. ' समर्थांविषयी बोलण्याचा अधिकार जेवढा समर्थांजवळच्या सांप्रदायिकांना होता तेवढा आजच्या समर्थभक्तांना व सांप्रदायिकांना नाही ' असे विधान करून फाटकानी पूर्वीच्या समर्थचरित्रकारांना अग्रस्थान दिलेले आहे आणि त्याच चरित्रकारांनी शिव-समर्थांविषयी जे उद्गार काढलेले आहेत ते मुद्दाम समर्थांची योग्यता वाढवण्यासाठी घुसडलेले आहेत असे म्हणून त्यांच्या पदरी खोटेपणा बांधलेला आहे. शके १५९४ मध्ये शिव-समर्थ भेट झाली हा फाटकांचा निष्कर्ष आहे. शके १६०० मध्ये जी सनद छत्रपतींनी समर्थांना दिली त्यात ' जे जे मनी धरिले ते ते स्वामींनी आशीर्वादप्रतापे मनोरथ पूर्ण केले ' अशी कृतज्ञता महाराजांनी व्यक्त केलेली आहे. या सहा वर्षांत शिव-समर्थ संबंधात विशेष काही घडले नाही अशी कबुली फाटकानी दिलेली आहे. तरीही छत्रपतींनी एवढ्या आदरपूर्वक रीतीने समर्थांना सनद का दिली व आपल्या सगळ्या यशाचे श्रेय समर्थकृपेला का दिले याचे उत्तर फाटक देऊ शकलेले नाहीत. शिव-समर्थ भेटीच्या प्रत्यक्ष पुराव्याकडे वळण्यापूर्वी शके १५९४ पर्यंत शिव-समर्थांना एकमेकांच्या कार्याविषयी काही कल्पना नव्हती हे कितपत संभवनीय आहे ते पाहिले पाहिजे. परदेशी चरित्रकारांनी छत्रपतींची जी चरित्रे लिहिलेली आहेत त्यात त्यांच्या राजकीय मुत्सद्देगिरीचा व कार्यकुशलतेचा मुक्तकंठाने गौरव करण्यात आलेला आहे. शत्रूंच्या राज्यात हेरांचे जाळे विणून त्यांच्या बारीक सारीक हालचाली जाणून घेण्यात छत्रपती निष्णात होते असे त्या चरित्रकारांनी नमूद केलेले आहे. अशा त्या छत्रपतींना रायगडापासून जवळच असणाऱ्या एका महान तेजस्वी संघटनाकुशल कर्मयोग्याविषयी शके १५९४ पर्यंत काहीच माहिती नव्हती हे कितपत संभवनीय आहे ? मोरया गोसावी, चिंतामणी देव, सिद्धेश्वरभट ब्रह्मे, गोपाळभट, महंत केवलभारती, देवभारती, मौनीबुवा, बाबा याकूत, सीताराम वाजपेय, पुरुषोत्तमभट धर्माधिकारी, रत्नागिरी गोसावी, तानपाठक नाकील, श्रीधरभट बापट,



अनुक्रमणिका







केशवभट पंडित, वासुदेव गोसावी, ज्ञानदेव-सोपान-देवांच्या समाध्यांचे व्यवस्थापक अशा कितीतरी व्यक्तींना छत्रपतींनी इनामे व वतने दिलेली आहेत. राज्यसाधनाच्या अगदी सुरुवातीच्या काळापासूनच त्यापैकी काहींना त्यानी भेटीही दिलेल्या आहेत. महाराष्ट्रामध्ये एक अभूतपूर्व चैतन्य निर्माण करणाऱ्या त्या शतकातील सर्वश्रेष्ठ कर्मयोगी महापुरुषाची भेट छत्रपती घेणार नाहीत हे कसे शक्य आहे ? छत्रपतींनी आग्र्यापासून तंजावरपर्यंत आणि गोवळकोंड्यापासून कोकणपट्टीपर्यंत अनेक मोहिमांचे नेतृत्व स्वीकारून धडक मारलेली होती. ते कचेरीबद्ध राजकारणी नव्हते. समर्थांनी देखील देशभर हिंडून भारताच्या सर्वांगीण जीवनाचे दर्शन घेतलेले होते. आपल्या कार्याला सुरुवात केल्यानंतरही 'नित्य नूतन हिंडावे' ही त्यांच्या मनाची धारणा होती. ते दिवाणखान्यातील ग्रंथसंभारात आयुष्य गाडणारे पढीक विद्वान नव्हते. महाराष्ट्रात सतत संचार करणाऱ्या या महापुरुषांना एकमेकांविषयी काहीच माहिती नव्हती व शके १५९४ पर्यंत त्यांची भेट होऊ शकली नाही हे अगदी असंभवनीय आहे. राष्ट्राच्या ऐहिक जीवनाविषयी उदासीन असणाऱ्या तुकारामांसारख्या संतांच्या सहवासाची अपेक्षा करणाऱ्या छत्रपतींनी बहुत जनासी चालवणाऱ्या, नाना मंडळे हालवणाऱ्या, 'धर्मासाठी मरावे । ... मुलुख बडवा का बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठी ॥' अशी गर्जना करणाऱ्या, समाजाला सामर्थ्ययोगाचा महामंत्र सांगणाऱ्या समर्थांसारख्या कृतिशूराकडे दीर्घकाळपर्यंत ढुंकूनही पाहिले नाही हे सर्वस्वी अशक्य आहे. त्या बाबतीत फाटकांनी पुढे केलेल्या पुराव्यांची योग्य ती शहानिशा करणे आवश्यक आहे.

## दोघांच्या कार्यांचा प्रसार व तुकारामांच्या उद्गारांचे मर्म

शके १५६६ मध्ये समर्थ कृष्णातीरी आले. शके १५६७ पासून त्यांनी मसूर येथे रामनवमीच्या उत्सवाला सुरुवात केली. सुप्रसिद्ध अकरा मारुतींची स्थापना शके १५६६ ते ७० पर्यंत त्यांनी केली. शके १५७० साली विजापूर दरबारातील सरदार व्यानतराव व बाजी घोरपडे यांनी चाफळच्या देवस्थानाला जमिनी इनाम दिल्या. चार वर्षांच्या कालावधीतच समर्थांची कीर्ती विजापूरपर्यंत पसरली होती. शके १५७१ च्या फाल्गुन वद्य द्वितीयेला तुकाराम वैकुंठवासी झाले. पंढरपुरच्या यात्रेला साऱ्या महाराष्ट्रातून लोक जातात. या चार वर्षांच्या कालावधीत तुकारामांबरोबरच समर्थांच्या कार्याची व श्रेष्ठ व्यक्तित्वाची ख्याती सर्वतोमुखी झालेली असली पाहिजे. वयाच्या पंधराव्या वर्षीच लोकविलक्षण कृत्ये यशस्वी करून दाखवणाऱ्या छत्रपतींकडे आसमंतातील प्रदेशांचे लक्ष जेथे वेधून राहिले तेथे परिणतप्रज्ञ वयात समर्थांनी आरंभलेल्या कार्याने निश्चितच फार मोठा प्रभाव आपल्या परिसरात पसरवलेला असणार. शके १५७० पर्यंत पाच किल्ले जिंकून छत्रपतींनी स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवलेली होती. तुकारामांसारख्या विश्व कवळणाऱ्या संतांनी दोघांच्याही कार्यांचे अलौकिकत्व अचूकपणे हेरलेले होते. शके १५६६ साली जरंड्याला असताना जयराम, तुकाराम, रंगनाथस्वामी यांची समर्थांना दर्शने झाली व शके १५७० साली चिंचवडचे मोरया गोसावी यांच्या घरी समर्थ-तुकारामांची भेट झाली असा उल्लेख कुडाळकराने लिहिलेल्या समर्थबाकेनिशीत आहे. म्हणूनच समर्थांचे वर्णन असलेला तुकारामाचा एक अभंग आढळतो. 'हुमुंजी रंगाचा उंच मोतीदाणा । रामदासी बाणा या रंगाचा ॥ पीतवर्ण कांति तेज अवटित । आळूं शोभत भ्रुकुटीमाजी ॥ कौपिन परिधान मेखला खांद्यावरी । तुंबा कुबडी करी समर्थांच्या ॥ रामनाम मुद्रा द्वादश हे टिळे । पुच्छ वळवळे कटीमाजी ॥ काष्ठांच्या पादुका स्वामींच्या पायात । स्मरणी हातात तुळशीची ॥ कृष्णातटाकी जाहले दर्शन । वंदिले चरण तुका म्हणे ॥' तुकारामांना छत्रपती व समर्थ या दोन्ही महापुरुषांच्या कार्यामधील परस्परपूरकत्व जाणवले म्हणूनच त्यांनी छत्रपतींना समर्थांकडे जाण्याची विनंती केली. छत्रपतींनी पूर्वीच समर्थांकडून अनुग्रह घेतल्याची जाणीव तुकारामांच्या छत्रपतींना पाठवलेल्या अभंगात्मक पत्रातून व्यक्त झालेली आहे. त्या पत्रात तुकारामांनी आपल्या वृद्धावस्थेचे वर्णन केलेले आहे. त्यावरून आयुष्याच्या अगदी शेवटच्या काळात हे पत्र लिहिलेले आहे हे उघड आहे. तुकारामाची सगळी निःस्पृहता त्यात भरून राहिलेली आहे. शरीरावर वृद्धापकाळाची अवकळा पसरलेली असताना दर्शनाचा सोहळा काय कामाचा ? तेव्हा छत्रपतींनी भेटीची

गोष्ट सोडून द्यावी अशी सलगीची विनंती तुकारामांनी केली. राजगृहात सामान्यांचा सन्मान राहत नाही आणि पांडुरंगासारखा पालनकर्ता असताना इतरांची आपल्याला चाड नाही असे निर्भीड सडेतोड उद्गार तुकारामासारखे श्रेष्ठ संतच शिवाजीसारख्या महापुरुषाला ऐकवू शकतात. 'तुझी चाड आम्हा नाही छत्रपती । आम्ही पत्रपती त्रैलोक्याचे ॥ चारी दिशा आम्हां भिक्षेचा अधिकार । नेमिली भाकर भक्षावया ॥' असे स्पष्ट बोल तुकारामांनी ऐकवलेले आहेत. त्या सबंध पत्रात तुकारामांनी समर्थांचा अनेक वेळा उल्लेख केलेला आहे. 'सद्‌गुरु श्रीरामदासाचे भाषण । तेथे घाली मन चळू नको ॥...... रामदासस्वामी सोयरा सज्जन । त्याशी तनमन अर्पी बापा ॥ ...... धरू नको आमुची कृपाळा । रामदासी डोळा लावी आता । ...... शरण असावे रामदासालागी ।' या तुकारामांच्या उद्गारातून समर्थांच्या भविष्यकालीन कार्याविषयीचे द्रष्टेपण स्पष्ट झालेले आहे. तुकारामांना छत्रपती व समर्थ यांची नावे देखील ठाऊक नव्हती असा फाटकांचा कयास आहे. पण या मुद्याच्या बाबतीत फार विस्तार होईल अशी सबब पुढे करून त्यानी धूर्तपणाने मौन पाळलेले आहे. एकमेकांची माहिती नसायला ते तिघे काही एकमेकांपासून शेकडो मैलांच्या अंतरावर नव्हते किंवा निर्मनुष्य अशा जंगलात ते दडून बसलेले नव्हते. ज्ञानेश्वर-नामदेवाच्या काळात काही प्रसिद्धीची आणि वाहतुकीची यांत्रिक साधने नव्हती, तरीदेखील नेवाशाचे ज्ञानेश्वर आणि पंढरपूरचे नामदेव यांची भेट झाली आणि त्यांनी मिळून तीर्थयात्राही केली. तुकाराम-समर्थांची एकमेकांना माहितीसुद्धा नव्हती हे फाटकांच्या सोयीसाठी मानण्याचे काहीही कारण नाही. तुकारामांच्या अभंगात जे द्रष्टेपण व्यक्त झालेले आहे ते अद्‌भुत चमत्कारात मोडणारे नाही. रवीन्द्रनाथामधला महाकवी, नारायण रामहंसामधला गंधर्व आणि मोहनदास गांधीमधला सत्याग्रही युगपुरुष महात्मा हे लोकमान्य टिळकांच्या द्रष्टेपणाने महाराष्ट्राला त्या व्यक्तींची ओळखही नव्हती त्याच वेळी हेरलेले होते. तुकारामाच्या अभंगात्मक पत्रावर डॉ. बाळकृष्ण यांनी घेतलेला आक्षेप मात्र महत्वाचा आहे. त्यांच्या मते तुकारामांच्या अभंगातील 'छत्रपती' 'अष्टप्रधान' हे शब्द शके १५७१ पूर्वी प्रचलित नव्हते. अष्टप्रधानपद्धती ही छत्रपतींनीच प्रथम सुरू केलेली नाही. मनुस्मृतीमध्ये राजाने सात किंवा आठ मंत्री करावेत असा आदेश आहे. शुक्रनीतीमध्येही मंत्र्यांची आठ हीच संख्या दिलेली आहे. 'अष्टानां मंत्रिणां मध्ये मंत्रं राजोऽपधारयेत्।' हा महाभारतकाराचा अभिप्राय आहे. चिटणीसांनी सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रात 'अष्टप्रधान यांचे व्यापार पूर्वीची शास्त्रपद्धती काढून, चाली पाहून केले' असे लिहिलेले आहे. बहामनी राज्यापासून मुसलमानांनीही अष्टप्रधानपद्धतीचा स्वीकार केलेला होता. शहाजीनी शिवाजीला त्याच्या वयाच्या बाराव्या वर्षी जेव्हा पुण्याला पाठवून दिले त्याच वेळी त्याच्या बरोबर प्रधानमंडळाची नेमणूक करून दिलेली होती. शामराज नीळकंठ पेशवे, सोनजी विश्वनाथ डबीर, महादाजी सामराज सुरनीस, माणकोजी दहातोंडे सरनौबत, नूरबेग सरनौबत, शामराज पद्मनाभी, रघुनाथ बल्लाळ सबनीस हे शहाजींनीच नेमलेले अधिकारी होते शहाजीनी नेमलेल्या अधिकाऱ्यांचे हुद्दे मुसलमानी राजवटीत प्रचलित होते. म्हणूनच तुकारामांच्या अभंगात अष्टप्रधानांचा व प्रचलित अशा पेशवा, सुरनीस, डबीर या शब्दांचा जो उल्लेख आहे त्यात कालविपर्यासाचा दोष नाही. पुण्यात आल्यापासूनच छत्रपती म्हणून शिवाजी राजांचा उल्लेख होऊ लागलेला होता. एक स्वतंत्र राजा म्हणूनच त्याची मुद्रा शहाजीनी करवलेली होती. शके १५६८ च्या सुमारास शिवाजीच्या अधिकाऱ्यांनी तयार केलेला लेख 'महाराष्ट्र सरस्वती मंदिर' या मासिकात प्रसिद्ध झालेला आहे. त्या लेखात शिवाजीचा उल्लेख 'छत्रपती' ही पदवी लावून केलेला आहे. या साऱ्यांचा निष्कर्ष असा की तुकारामांच्या आयुष्यातील शेवटच्या चार वर्षात ( शके १५६७ ते ७१ ) छत्रपती आणि समर्थ यांची कीर्ती पुणे-सातारा विभागात सगळीकडे पसरलेली होती.

## राजे यांची पहिलीच भेट :

## संबंध पारगावशी– चाफळशी नव्हे !

शिव-समर्थांची भेट १५७१ मध्ये झालेली नसून शके १५९४ मध्ये झालेली आहे हे सिद्ध करण्यासाठी काही पत्रांचा आधार घेतला जातो. त्यापैकी पहिले

पत्र शके १५८० मधले आहे. भास्कर गोसाव्याने दिवाकर गोसाव्याला ते लिहिलेले आहे. त्यात शिवाजी राजे यानी समर्थांची चौकशी करून चाफळच्या उत्सवाला प्रतिवर्षी २०० होन नेमून दिल्याचा उल्लेख आहे. समर्थांच्या कार्याची पुरेपूर कल्पना असल्यामुळेच छत्रपतींनी वार्षिक वर्गणी देऊ केलेली आहे. भास्कर गोसाव्याची योग्य ती परीक्षा घेणे हे त्यांच्या व्यवहार-कुशलतेस धरूनच आहे. नाना युक्त्या प्रयुक्त्यांचा वापर करण्यात निष्णात असलेल्या छत्रपतींनी भास्कर हा समर्थांचा शिष्य आहे की नाही याची शहानिशा करून घेण्यासाठी एका साध्या युक्तीचा अवलंब केला. चाफळच्या उत्सवाचे स्वरूप शके १५८० पर्यंत वाढत गेल्यामुळेच समर्थांनी देणगीचा स्वीकार केलेला असावा. समर्थांविषयी काहीही माहिती नसताना केवळ एखाद्या महंताच्या सांगण्यावरून वर्षासन नेमून देण्याएवढे छत्रपती अव्यवहारी आणि बेहिशेबी नव्हते. दुसरे पत्र केशव गोसाव्याने दिवाकर गोसाव्याला चैत्र व. २, शके १५९४ या दिवशी लिहिलेले आहे. 'आपण पत्र पाठविले ते पावले. मजकूर समजला. रा. शिवाजी राजे भोसले हे समर्थांचे भेटीस येणार म्हणून लिहिले ते समजले. मी येणार होतो. परंतु माझी प्रकृती फार बिघडली. येणे होत नाही. मी इकडून अकास येणेसाठी लिहिले. परंतु अकाचेहि येणे व्हावयाचे नाही. गावी भानजी गोसावी असतील. राजे यांची पहिलीच भेट आहे. वाडीचे लोक खटपटेस आणावे. उपयोग होईल. झाडी बहुत आहे. इकडून उदईक त्रिंबक गोसावी व विठ्ठल गोसावी व दत्तात्रय गोसावी पाठवून देतो. श्रीचे उत्सवास भिक्षेचे जे धान्य मिळाले ते अश्वत्थभट मसूरकर या समागमे पाठविले. दत्ताजीपंताकडून दोनशे होन उत्सवास पाठवले ते आले असतील. लोभ करावा, हे विनंती ' या पत्रातील वाक्ये अत्यंत सूचक असूनही त्यांचा साकल्याने विचार फाटकांना करता आलेला नाही. या पत्रामागची परिस्थिती त्यानी नीट समजावून घेतली असती तर उडवाउडवी करणे त्याना फार जड गेले असते. चाफळ मठाचा व राजदरबाराचा सगळा कारभार पाहणाऱ्या दिवाकर गोसाव्याला केशवाने माहितगारासारख्या सूचना कशा दिलेल्या आहेत त्याचा नीट विचार केला पाहिजे. छत्रपतींकडून दोनशे होन त्याच्याकडे कसे आले ? राजे यांची पहिलीच भेट असे सांगून पुढे सूचना केशवाने दिलेल्या आहेत त्यांचा भेटीशी कितपत निकटचा संबंध आहे ? दिवाकरासारख्या अग्रगण्य समर्थ-शिष्याला केशवाने का सूचना दिल्या आहेत ? कोणत्या ठिकाणाहून कोणत्या ठिकाणी हे पत्र पाठविलेले आहे ? या सगळया प्रश्नांची उत्तरे शोधणे अतिशय महत्त्वाचे आहे. या सगळया गोष्टी मोठ्या धूर्तपणाने टाळून पत्रातील 'च' कारावर फाटकानी अनाठायी मल्लीनाथी केली आहे. या प्रकरणातील सर्वात महत्त्वाची गोष्ट अशी की शके १५९४ या वर्षीचाच तेवढा रामनवमीचा उत्सव चाफळला न होता पारगावला झाला. त्या उत्सवाच्या अगोदरपासूनच समर्थांचे वास्तव्य पारगाव मठात होते. त्यावेळी केशव आणि भानजी त्यांच्याबरोबर होते. उत्सवाच्या सुमारास केशव चाफळला आला व दिवाकर गोसावी पारगावला गेला. त्याच वेळी पन्हाळ्याची मोहीम छत्रपतींनी आखलेली होती. वाटेवरच समर्थांची भेट घेण्याचा त्यानी विचार केला आणि त्याप्रमाणे पूर्वसूचनाही दिली. हे सगळे योजनाबद्ध रीतीने झालेले आहे. छत्रपतींच्या भेटीच्या पूर्वतयारीसाठी दिवाकराने केशवाला बोलावलेले आहे. बराच काळ केशवाचे वास्तव्य पारगावला असावे. म्हणूनच झाडी बहुत आहे अशी माहिती व ती साफ करण्यासाठी आजूबाजूच्या लोकांना बोलवावे अशी सूचना पारगावात नवख्या असलेल्या दिवाकराला त्याने दिलेली आहे. छत्रपतींची भेट **पारगावला प्रथमच** होत असल्यामुळे एवढ्या पूर्वतयारीची आवश्यकता भासलेली आहे. चाफळ येथे भेट होणार असती तर रस्ता साफ करून पूर्वतयारी करण्याची काहीच जरूरी नव्हती. केशवाने दिलेल्या सूचनांवरून एक गोष्ट निर्विवाद आहे की राजे यांची पहिलीच भेट या विधानाचा संबंध संपूर्णपणे पारगावचा मठ या स्थलाशी आहे. केशव गोसावी चाफळला असल्यामुळे दिवाकराच्या गैरहजेरीत वर्षासनाचे दोनशे होन प्रथम त्याच्याकडे आले आणि त्याने ते पारगावला दिवाकराकडे पाठवले. शिव-समर्थांच्या भेटीतल्या पहिलेपणाचा उल्लेख दिवाकराच्या पत्रात नाही. शिव-समर्थांची भेट व परस्पर संबंध या गोष्टी पूर्वीच घडलेल्या आहेत म्हणून मोहिमेच्या गडबडीत असतानाही पारगावसारख्या

नवख्या ठिकाणीही समर्थांना भेटण्याची योजना छत्रपतींनी आखली.

## ' श्री ' वर उभारलेला अनुमानाचा डोलारा

श्रा. शु. ९. शके १५९४ या दिवशीच्या आणखी एका पत्राचा फाटकांनी निर्देश केलेला आहे. हे पत्र छत्रपतींनी दत्तोपंत वाकनीस यास लिहिलेले आहे. चाफळच्या महोत्सवाला अनेक लोक जमतात त्यांना चोर, लुटारू व सैनिक यांच्यापासून त्रास होणार नाही अशी व्यवस्था ठेवण्याची त्यात आज्ञा आहे. या पत्रातील रामदास या नावामागे ' श्री ' नाही एवढ्यावरच फाटकांनी आपला डोलारा उभारलेला आहे. छत्रपती बारीक सारीक तपशीलातही अत्यंत दक्षता बाळगीत असत असे शिफारसपत्र त्यांनी शिवाजींना दिलेले आहे. ( भास्कर गोसाव्याच्या भेटीच्या वेळी हीच दक्षता छत्रपतींनी बाळगली हे सत्य मात्र फाटक कबूल करू इच्छीत नाहीत. ) त्या पत्रात ' श्री ' नसल्यामुळे छत्रपतींना समर्थांची काहीच माहिती नव्हती हा फाटकांचा निष्कर्ष ! केशव गोसाव्याच्या पत्रातही समर्थांच्या नावामागे ' श्री ' नाही म्हणून तो समर्थसंप्रदायातील नव्हता असे म्हणता येणार नाही. प्रथमच एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की छत्रपतींची पत्रे कारकून लिहून घेत असत. त्यावेळी ' श्री ' शब्द गळला असण्याची शक्यता आहे. फाटकांच्या विवेचनाचा रोख असा की समर्थांविषयी माहिती नसल्यामुळे एखाद्या सामान्य माणसाप्रमाणे त्यांचा उल्लेख करण्यात आला. महाराष्ट्रभर प्रचंड संघटना उभी करून प्रवृत्तिधर्माचा सतत उद्घोष करणाऱ्या समर्थांविषयी छत्रपतींना शके १५९४ पर्यंत काहीच माहिती नसेल तर छत्रपतींच्या जीवनातील ते मोठेच वैगुण्य आहे असे म्हणावे लागेल. अर्थात तसे झालेले नाही हे उघड आहे. दुसरी गोष्ट अशी की आपल्या हाताखालच्या व्यक्तीबाबत ' राजमान्य राजश्री, ' ' दंडवत ' यासारखे शब्द योजणारे छत्रपती हे केवळ समर्थांची भेट झाली नाही म्हणून त्यांचा अतिसामान्याप्रमाणे उल्लेख करतील हे सर्वस्वी अशक्य आहे. कारकुनाच्याच हातून चूक होण्याची शक्यता अधिक ! श्री. वा. म. जोशी हे सिंध हैद्राबादच्या तुरुंगात असताना त्यांच्या खाणाखुणांची नोंद करताना कारकुनाने गफलती केल्यामुळे सुटकेच्या वेळी त्यांना सोडण्याचे तुरुंगाधिकाऱ्याने साफ नाकारले. नुकताच पानशेत धरणफुटीचा जो अहवाल सादर करण्यात आला त्यातील निर्णायक वाक्यामधील 'no' हा अगदी महत्त्वाचा शब्द गळाल्यामुळे सगळ्या विधानाचा अर्थ एकदम उलटा बनला. प्रत्यक्षातील घटना अशा अतर्क्यपणे घडत असतात त्याचे प्रत्यंतर यावे म्हणून या सत्य घटनांचा हवाला दिलेला आहे. समर्थांची योग्यता ठाऊक नसती तर खास बंदोबस्त ठेवण्याचा हुकूम छत्रपतींनी आपल्या अधिकाऱ्यांना दिला नसता. समर्थांच्या पूर्वीपासून महाराष्ट्रात निरनिराळ्या ठिकाणी मोठमोठे उत्सव होत होते, यात्रा भरत होत्या. समर्थांनी चालवलेल्या उत्सवाचीच विशेष दखल घेतलेली आहे हे लक्षात घेतले पाहिजे. शके १५९४ मध्ये शिवथर प्रांती शिव-समर्थांची एक भेट झालेली होती. त्यानंतरच बंदोबस्ताचे पत्र छत्रपतींनी लिहिलेले आहे. इतिहासाचा मागोवा घेताना अनेक प्रकारच्या संभवनीयता ध्यानात घ्याव्या लागतात. संभवनीयता हा इतिहासाचाच केवळ नव्हे तर जड अशा पदार्थविज्ञानशास्त्राचाही पाया आहे.

## पत्रांच्या अर्थाचा विपर्यास

शिव-समर्थ भेट शके १५९४ मध्ये ' केव्हा तरी ' झाली हे सिद्ध करण्यासाठी फाटकांनी आणखी दोन पत्रांचा आधार घेतलेला आहे. त्यापैकी एक पत्र दिवाकर गोसाव्याने आपल्या मुलाला पाठवलेले आहे व दुसरे समस्त गुरुबंधूंना लिहिलेले आहे. चाफळच्या मठाच्या व उत्सवाच्या व्यवस्थेबाबत उद्धव गोसावी व दिवाकर गोसावी यांमध्ये उद्भवलेले वितुष्ट ही या पत्रामागची भूमिका आहे. राजदरबारची कामे व छत्रपतींनी चाफळच्या मठाला दिलेल्या देणगीची व्यवस्था समर्थांनी अमात्य, दत्तोपंत वाकनीस व शिष्य या सर्वांसमोर दिवाकर गोसाव्याकडे सोपवलेली होती. त्याचीच आठवण आपल्या पत्रातून दिवाकराने दिलेली आहे. ही पत्रे सज्जनगडाहून चाफळला पाठवलेली आहेत, पहिल्या पत्रातील शेवटचा परिच्छेद दिवाकरबंधू अनंत गोसाव्याने व दुसऱ्या पत्रातील शेवटचा परिच्छेद चिमाआक्काने लिहिलेले असे आहेत. परिधावी नाम संवत्सरी छत्रपतींना परमार्थ झाल्याचे दोघांनीही नमूद केलेले आहे. त्यापैकी

अनंत गोसाव्याने शिंगणवाडी या स्थलाचाही उल्लेख केलेला आहे. 'परमार्थ केला' या शब्दांचा व संवत्सरनामाचा आधार फाटकांनी घेतलेला आहे. गुरुशिष्यांची भेट म्हटली की परमार्थच हीच सर्व-साधारण समजूत अनंत व चिमाअक्का यांची! शिवाय या दोन्ही पत्रातील उल्लेख दिवाकराने केलेले नाहीत हे महत्त्वाचे आहे. परिधावी संवत्सराचा एवढा आवर्जून जो उल्लेख अनंत व चिमाअक्का यांनी केलेला आहे त्याचा रोख छत्रपतींनी दिलेल्या देणगीकडे आहे, प्रथम भेटीकडे नाही. कोणत्या विशिष्ट भेटीनंतर दिवाकर गोसाव्याकडे मठाच्या व्यवस्थेचे व उत्सवाचे काम सोपवण्यात आले तिचे छत्तीस वर्षां-नंतर स्मरण देणे हा त्या पत्रातील उल्लेखांचा उद्देश आहे. समर्थांच्या आदेशाची अवज्ञा उद्धव गोसावी करू लागले म्हणून दिवाकरातर्फे दिलेली ती साक्ष आहे. शिव-समर्थांची एक भेट शके १५९४ परिधावी संवत्सरी झालेली असली तरी अनंताच्या म्हणण्या-प्रमाणे शिंगणवाडीला झालेली नसून शिवथरप्रांती झालेली आहे. शिंगणवाडीला जी भेट झाली ती शके १५९५ प्रमादी नाम संवत्सरी! या दोन्ही ठिका-णांच्या भेटीत दोन निरनिराळी इनामे छत्रपतींनी दिलेली असल्यामुळे छत्तीस वर्षांनी पत्र लिहिणाऱ्या अनंत गोसाव्याने दोन्ही गोष्टी एकत्र मिसळल्या. सत्य-शोधनाची व संशोधनाची प्रौढी मिरवणाऱ्या फाटकांनी अनंत गोसाव्याचे विधान डोळे झाकून स्वीकारले. शिव-कालीन पत्रसारसंग्रह खंड २ व श्रीसंप्रदायाची कागदपत्रे (ले. १८-१९) यांमध्ये दत्ताजी त्रिमल याची दोन पत्रे प्रसिद्ध झालेली आहेत. शिवथरप्रांती शिवाजी राजे समर्थांना भेटण्यास गेले त्यावेळी त्यांनी श्री रघु-नाथ देवास ११ गावे इनाम दिली. देवाचा प्रसाद म्हणून या गावांचे उत्पन्न राजगृही जमा करण्यास समर्थांनी सांगितले. तरीही छत्रपतींनी त्या गावांच्या प्रत्येकी ११ बिघ्यांचे म्हणजे १२१ बिघ्यांचे उत्पन्न समर्थांकडे चालू ठेवले. त्यांच्या सनदा दिवाकर गोसाव्याकडे दिल्या असा पहिल्या पत्रात उल्लेख आहे. दुसऱ्या पत्रात चाफळच्या (शिंगणवाडीच्या) भेटीचा उल्लेख आहे. त्यात रामनवमीच्या उत्सवासाठी ११ होन, १५० टक्के खुर्दा, धान्य, कापड वगैरे गोष्टींची वार्षिक नेमणूक जावळीच्या सुभ्यातून करून दिल्याचा निर्देश आहे. चाफळची म्हणजे शिंगणवाडीची भेट शके १५९५ प्रमादी नाम संवत्सरी झालेली आहे. अनंत गोसावी आणि चिमाअक्का यांच्या पत्रातील परिधावी संवत्सरामधल्या शिवसमर्थांच्या भेटीचा उल्लेख हा दिवाकर गोसाव्याच्या अधिकाराची जाणीव देण्यासाठी आहे. प्रथम भेटीचा त्यात काही संबंध नाही. याच संदर्भात श्रीसंप्रदायाची कागदपत्रे लेखांक ४३ याची नोंद घेणे आवश्यक आहे. शके १६०३ दुर्मति नाम संवत्सरातील पौष व. ९ या दिवशी आपला अंतकाळ जवळ आलेला आहे हे जाणून समर्थांनी संभाजीला उद्देशून काही उद्गार काढले ते या लेखां-कात समाविष्ट केलेले आहेत. त्यात 'प्रमादी नाम संवत्सरी सींगणवाडीचे मठी राजश्रींनी (शिवाजींनी) श्री च्या सर्व कार्याचा आइकार केला त्याप्रमाणे त्यांनी नित्य उत्सव व यात्रासमारंभ उत्तम चालविला' अशी समर्थांच्या उद्गारांची नोंद आहे. अनंत गोसाव्याच्या पत्रावर विसंबून संवत्सरनाम व 'परमार्थ' शब्द यांच्या आधारे शके १५९४ मध्ये शिव-समर्थांची भेट झाली असा जो निष्कर्ष फाटकांनी काढलेला आहे तो चुकीचा आहे. गडबडीने पुरावे सादर करताना फाटकांनी अनेक ठिकाणी गोंधळ उडवलेला आहे व काही महत्त्वाच्या गोष्टी लपवलेल्या आहेत. वरील लेखांकावर त्यांनी असे भाष्य केलेले आहे आहे की त्यात माघ व. ९ च्या अवतारसमाप्तीचा उल्लेख असल्यामुळे त्याच्यावर लिहिलेला पौष व. ९ हा काल चुकीचा आहे. वृत्तलेखकाने पौष व. ९ हा लेखनाचा काल असे म्हटलेलेच नाही. पौष व. ९ या दिवशी समर्थांनी कृपापूर्वक उद्गार काढले असा स्पष्ट उल्लेख त्या लेखांकात आहे. पण रामदासी वादाने बेभान बनल्यामुळे पुष्कळशा उघड व स्पष्ट गोष्टींना फाटकांनी विपर्यस्त स्वरूप दिले. समर्थांच्या कृपावचनांचा काल शके १५९४ च्या पुढचाच आहे असे विधान फाटकांनी केलेले आहे. लेखांकातील पहिली दोन वचने भविष्य-कालसूचक व आशीर्वादरूप आहेत. तिसऱ्या वचना-पासून भूतकालीन घटनांची आठवण दिलेली आहे. पहिलीच आठवण 'पूर्वी राजश्रीस राजधर्म व क्षात्र-धर्म व आलेंड सावधान ऐसी पत्रे पाठवली होती ती पत्रे प्रसंगानसार वाचून मनासि आणून वर्तुणूक होईल तरी वचनाचा अभिमान श्री देवासि आहे.' अशी









आहे. नेमक्या याच गोष्टीची दखल घेणे फाटकांना मानवले नाही. एकेका शब्दावर इमले उभे करणारे फाटक हे अत्यंत महत्त्वाच्या गोष्टींना हुकूमशाही वृत्तीने दडपून टाकण्यात मात्र फारच पटाईत आहेत. 'श्री रामदास : वाङ्मय व कार्य' या अगदी अलीकडच्या आपल्या ग्रंथातही 'क्षात्रधर्म' हे प्रकरण भेटायला आलेल्या सामान्य शिपाईगड्यांना उद्देशून लिहिलेले आहे असे चुकीचे विधान त्यांनी बेधडक ठोकून दिलेले आहे. वस्तुस्थिती वेगळी आहे हे वरील लेखांकाने दाखवून दिलेले आहे. शके १५७१ मध्ये समर्थांनी छत्रपतींना अनुग्रह देऊन 'राजधर्म' व 'क्षात्रधर्म' सांगितले आणि निळो सोनदेव व बाळाजी आवजी यानाही अनुग्रह देऊन 'सेवकधर्मा'चा उपदेश केला. श्रीमंत पंत अमात्य, संस्थान बावडा यांचे वंशवृत्त श्री. गोरे यांनी प्रसिद्ध केलेले आहे. त्यात छत्रपती, निळो सोनदेव व बाळाजी आवजी यांच्या शके १५७१ मधील अनुग्रहाचा व 'सेवक धर्मा'चा उल्लेख आहे. (पृ. १५) त्याच वंशवृत्तात आणखीही एक उल्लेख असा आहे की शके १५८१ मध्ये चाफळला उद्धव गोसाव्याच्या कीर्तनात समर्थ बसलेले असताना छत्रपतींनी मोर्चेल व निळोपंतांनी भालदार काठी घेतली होती (पृ. १५-१६). या वंशवृत्तावरून हे उघड आहे की शके १५७१ मध्ये अनुग्रहानंतर समर्थांनी छत्रपतींना 'राजधर्म' 'क्षात्रधर्म' यांचा उपदेश केला. हा उपदेश आणि 'निश्चयाचा महामेरू' या पत्रातील छत्रपतींच्या गुणांचा व कर्तृत्वाचा गौरव या दोन्ही गोष्टी एकत्र ठेवून पाहिल्यानंतर एक महत्त्वाचे सत्य जाणवते की 'राजधर्म-क्षात्रधर्म' यातील उपदेश स्वराज्यस्थापनेला ज्याने नुकतीच सुरुवात केलेली आहे अशा तरुण शिवाजीला उद्देशून आहे आणि दुसऱ्या पत्रातील गौरव अभूतपूर्व यश संपादणाऱ्या छत्रपतींच्या गुणांचा आहे. शके १५९४ नंतर राजधर्म-क्षात्रधर्माचा उपदेश छत्रपतींना करण्याची काहीच जरूरी नव्हती. रोहिडेश्वराच्या देवळात स्वराज्यसाधनेची व स्वधर्मरक्षणाची शपथ घेऊन पहिली वहिली पावले टाकणाऱ्या १९ वर्षांच्या तरुण तडफदार शिवाजीला उद्देशून समर्थांनी तो उपदेश केलेला होता. माणसाची पारख करून त्याच्या योग्यतेप्रमाणे त्याला काम द्यावे, फितवेखोरांचा संहार करावा, लोक राजी राखावे, न्यायाची पायमल्ली होऊ देऊ नये, उपाधीचा कंटाळा करून व धीर सोडून चालणार नाही महत्त्वाची कामे पेलणारे लोक तयार करावे, राजाने राजधर्माचेच पालन करावे, रणांगणात देह ठेवून सद्गतीला जावे किंवा विजय मिळवून महद्भाग्याचे मानकरी व्हावे, निर्भयपणे शत्रुसैन्यावर तुटून पडावे, जय मिळवायचा असेल तर हिंमत सोडू नये, देवधर्मांचा उच्छेद होत असेल तर जित्यापरीस मृत्यु भला, 'मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।,' देवद्रोह्यांना ठार मारावे या साऱ्या उपदेशाचे स्वरूपच असे आहे की शिव-समर्थांची भेट शके १५७१ साली झाली याच सिद्धांताला बळकट बनवते. छत्रपतींच्या तरुणपणी जो उपदेश त्यांना समर्थांनी केलेला होता त्याचेच मनन करण्याचा आदेश तरुण अननुभवी संभाजीला समर्थांनी दिलेला आहे.

## सनद नीट वाचली असती तर

समर्थांचे कृपाशीर्वाद स्वराज्यसाधनेच्या सुरुवातीपासूनच लाभलेले होते याचे प्रत्यंतर म्हणजे खुद्द छत्रपतींनी आश्विन शु. १०, शके १६०० ला समर्थांना दिलेली सनद ! त्यात ज्या ज्या गोष्टी व्यक्त झालेल्या आहेत त्यांचा संबंध फाटकानी मोठ्या कष्टाने शके १५९४ नंतरच्या काळाला लावण्याचा केविलवाणा प्रयत्न केलेला आहे. ती सनद अशी—

'श्रीसद्गुरुवर्य श्रीसकलतीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराज श्रीस्वामी स्वामीचे सेवेसी.

चरणरज शिवाजी राजे यांनी चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना जे मजवर कृपा करुनु सनाथ केले आज्ञा केली की, तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करुनुं धर्मस्थापना देवब्राह्मणाची सेवा प्रजेची पीडा दूर करून पाळण रक्षण करावे, हे व्रत संपादून त्यात परमार्थ करावा तुम्ही जे मनी धराल ते श्री सिद्धीस पाववील, त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट दुराढे लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्य करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशी स्थळे दुर्घट करावीं ऐसे जे जे मनी धरिले ते ते स्वामींनी आशीर्वादप्रतापे मनोरथ पूर्ण केले. याउपरी राज्य सर्व संपादिले ते चरणी अर्पण करुनु सर्व काळ सेवा घडावी ऐसा विचार मना आणिला तेव्हा आज्ञा जाहाली की;







तुम्हास पूर्वी धर्म सांगितले तेच करावेत तीच सेवा होय ऐसे आज्ञापिले... ... राज्य संपादिले यातील ग्रामभूमी कोठे काय नेमावी ते आज्ञा व्हावी, तेंव्हा आज्ञा जाहाली की, विशेष उपाधीचे कारण काय तथापि तुमचे मनी श्रींची सेवा घडावी हा निश्चय जाहाला त्यास येथावकाश जेथे जे नेमावेसे वाटेल ते नेमावे व पुढे जसा संप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विचार होईल तैसे करावे याप्रकारे आज्ञा जाहाली यावरुनु देशांतरी सांप्रदाय व श्रीसंनिध चाफळी एकशे एकवीस गाव सर्वमान्य व एकशे एकवीस गावी अकरा चिवे याप्रमाणे व अकरा स्थळी श्रींची स्थापना जाहाली ...'

सनदेच्या शेवटच्या भागात नेमणुकीचा तपशील दिलेला आहे. समर्थ व छत्रपती यांच्या मधल्या संबंधाचा संपूर्ण आलेखच या सनदेत प्रकट झालेला आहे. पहिल्याच वाक्यात समर्थांनी कोणती 'आज्ञा' केली त्याचा उल्लेख आहे. समर्थांनी 'सनाथ' केल्याची ग्वाही आहे. शके १५९४ पूर्वीच छत्रपती 'सामर्थ्यवंत, यशवंत, कीर्तिवंत, निश्चयाचा महामेरू, बहुत जनांसी आधारू, आचारशील, विचारशील, धर्मशील, धीर, शूर, क्रियेसी तत्पर, धर्मरक्षक, महाराष्ट्रधर्म पालनकर्ते' असे सगळयाच दृष्टीने कर्तृत्वाच्या व यशाच्या उच्च शिखरावर पोचलेले होते. ते कोणत्याच दृष्टीने अनाथ नसल्यामुळे समर्थांनी आपल्यावर कृपा करून 'सनाथ' केले हे उद्गार शके १५९४ मध्ये अस्थानी आहेत. अशा गुणमहत्त्वासी तुलना नसलेल्या धर्मरक्षक व्यक्तीला राज्यसाधन झाल्यानंतर राज्यसाधन करून धर्मस्थापना करण्याची 'आज्ञा' समर्थ देखील देणार नाहीत. असला अप्रयोजकपणा फाटकांनी आपल्या सोयीसाठी छत्रपती व समर्थ याच्या मस्तकी निष्कारण लादलेला आहे. सनदेमधल्या पहिल्याच वाक्यावरून हे स्पष्ट आहे की शके १५७१ च्या पहिल्या भेटीतच समर्थांनी छत्रपतींना अनुग्रह देऊन धर्मसंस्थापनेसाठी, प्रजापालनासाठी राज्यसाधनेचा आदेश दिला. सनदेतील पहिले वाक्य आणि शके १५७१ च्या पहिल्याच भेटीत केलेला 'राजधर्म–क्षात्रधर्मा'चा उपदेश यामध्ये सुसंगती आहे. 'रायांनी करावे राजधर्म । क्षत्रीं' करावे क्षात्रधर्म ।' असा स्पष्ट राज्यसाधनेचा उपदेश समर्थांनी केलेला आहे. देवाधर्मांचा उच्छेद होत असताना आपण निष्क्रियतेने जगत राहिलो तर 'आपुला स्वधर्म बुडविला । ऐसे समजावे ॥' म्हणूनच धर्मसंस्थापनेसाठी 'क्षात्रधर्मा'चे पोषण व संवर्धन करावे असा समर्थांनी उपदेश केला, देव, धर्म व पूजा यांचे पालन व रक्षण करावे ही समर्थांची गुरु म्हणून आज्ञा झाल्याचा निर्देश सनदेत आहे. धर्मस्थापनेच्या आज्ञेनंतर दिलेल्या आशीर्वादाचे स्वरूप सनदेत व्यक्त झालेले आहे. 'तुम्ही जे मनी धराल ते श्री सिद्धीस पाववील' असा समर्थांनी आशीर्वाद दिला. 'देवदास पावती फत्ते । यदर्थी संशय नाही ॥' अशी हमी 'क्षात्रधर्मा'त आहे. सनदेच्या पुढच्या भागात असा उल्लेख आहे की दुष्टांचा नाश, विपुल द्रव्यप्राप्ती, दुर्गम गडांचे स्वामित्व व काहींची बांधणी या बाबतीत जी ध्येये बाळगली व जे उद्योग केले त्यांची स्वामींच्या आशीर्वादप्रतापाने परिपूर्ती झाली. 'जो जो उद्योग केला' व 'जे जे मनी धरिले' या शब्दसमूहात छत्रपतींच्या स्वराज्य-स्वधर्म स्थापनेच्या समग्र कार्याचे स्वरूप अभिप्रेत आहे. इतके स्पष्ट उल्लेख सनदेत असूनही फाटकांनी ओढून ताणून तिचा संबंध शके १५९४ नंतरच्या काळाशी जोडण्याचा व्यर्थ खटाटोप केलेला आहे. सर्व राज्य समर्थचरणी अर्पण करून सर्व काळ सेवा घडावी अशी इच्छा छत्रपतींनी प्रदर्शित केली. तेंव्हा समर्थांनी 'तुम्हास पूर्वी धर्म (राजधर्म, क्षात्रधर्म, धर्मसंस्थापना), सांगितले तेच करावेत तीच सेवा होय ऐसे आज्ञापिले. पुढे शके १५९४ मध्ये चाफळच्या उत्सवासाठी तरी ग्रामभूमीच्या देणगीचा स्वीकार व्हावा अशी प्रार्थना छत्रपतींनी केली. समर्थांना त्या उपाधीची आवश्यकता नव्हती तरीही छत्रपतींच्या विनंतीचा त्यांनी सन्मान केला. 'तथापि तुमचे मनी श्रींची सेवा घडावी हा निश्चय जाहाला त्यास येथाअवकाश जेथे जे नेमावेसे वाटेल ते नेमावे व पुढे जसा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विचार होईल तैसे करावे' अशी समर्थांनी छत्रपतींना अनुज्ञा दिली. छत्रपतींच्या श्रीरामभक्तीखातर भूमीची पहिली देणगी समर्थांनी शके १५९४ मध्ये स्वीकारली. एकीकडून देणगी स्वीकारली आणि दुसरीकडून त्या भूमीचे सगळे उत्पन्न देवाचा प्रसाद म्हणून राजगृही जमा करावे असा निःस्पृह विरक्ताला शोभेसा आदेश दिला.








त्याच्या पूर्वी फक्त चाफळच्या उत्सवाला छत्रपतींकडून मागणी न करता दोनशे होन येत असत. श्रीसंप्रदायाचा आणि इतर सगळ्या मठांचा विस्तार समर्थांनी आपल्या पुरुषार्थ वैभवावर करून ' समर्थ ' पदवी सार्थ केलेली होती. निःस्पृहपणे विख्यात झालेल्या समर्थांविषयी ' आपली स्वयंसिद्ध निःस्पृहता आवरून स्वामींनी जेथे जे नेमावेसे वाटेल ते नेमावे अशी आज्ञा केली ' असे फाटकांनी आपल्या स्वभावसिद्ध खवचटपणाला अनुसरून लिहिलेले आहे. सूर्यावर चूळ फेकू पाहणाऱ्याची काय अवस्था होते ते समर्थांनीच सांगून ठेवलेले आहे हे फाटकांसारखे थोर व्यासंगी जाणूनच असतील. त्यांनी सनद नीट वाचली असती तर छत्रपतींच्या मनातील श्रीरामाच्या सेवेचा निश्चय पाहून त्यांना योग्य वाटेल ते नेमण्याची अनुज्ञा समर्थांनी दिली हे त्यांच्या लक्षात आले असते. समर्थांची निःस्पृहता धगधगीत होती. त्याचे प्रत्यंतर छत्रपतींच्याच एका पत्रातून ( श्रीसंप्रदायाची कागदपत्रे- लेखांक १४ ) येते. चाफळच्या उत्सवाला वर्षासन सुरू झाल्यानंतर तीनच वर्षांनी समर्थांनी वर्षासनाचा स्वीकार न करता पुढेही ते पाठवू नये असा निरोप रायगडावर छत्रपतींकडे पाठविला. आपले काहीतरी चुकले या विचाराने छत्रपती अस्वस्थ झाले आणि चैत्र व. १३ शके १५९८ या दिवशी जावळीच्या देशाधिकाऱ्याला त्यांनी एक खरमरीत पत्र पाठवले. पुढच्या वर्षासाठीची सामुग्री अगोदरच्या वर्षीच पाठवण्याची छत्रपतींनी आज्ञा केली. उत्सवाच्या देणगीत काडीचेही अंतर पडता कामा नये अशी जरब छत्रपतींनी दिलेली आहे. शके १५९४ पर्यंत चाफळसकट सगळ्याच मठांचा कारभार सतत चोवीस वर्षे आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावावर समर्थांनी यशस्वीपणे चालवलेला होता. आपणहून देणगीची मागणी करणाऱ्या आपल्या पट्टशिष्याची– कल्याणाची– कानउघाडणी समर्थांनी केल्याचे खुद्द कल्याणानेच लिहून ठेवलेले आहे. ( श्रीसंप्रदायाची कागदपत्रे- लेखांक ५० ) समर्थांनी देणगी केवळ छत्रपतींच्या भक्तीखातर स्वीकारली हे सनदेतच स्पष्ट आहे. फाटकांनी कित्येक गोष्टींचा जाणून बुजून विपर्यास केलेला आहे. उत्तुंग, भव्य आणि अलौकिक विभूतिमत्त्वाचा साक्षात्कार करून घेण्याची कुवतच किंवा तयारी फाटकांची नाही. समर्थांच्या कर्तृत्वाविषयीचा आदर छत्रपती राजारामाच्या पत्रातही ओतप्रोत भरलेला दिसतो. ' श्रीचे कृपेकरून महाराजांचे राज्य वृद्धीते पावले. ... पूर्वी श्रीचे वचन राजश्री कैलासवासी यासी आहे की श्री देवाचा चढता वाढता महोत्सव चालवावा तैसेच चढते वाढते राज्य अभिवृद्धीते पावेल हे श्री चे कृपापूर्वक आशीर्वादरूप वाक्य आहे. ' समर्थकृपेचे ऋण असे राजारामानेही शिरोधार्य मानलेले आहे. त्यावरून छत्रपतींच्या सनदेत त्यांच्या समग्र कार्याचा निर्देश आहे हे स्पष्ट होते.

## इतर काही पुराव्यांची दखल

शिव–समर्थ भेटीबाबत अस्सल कागदपत्रांप्रमाणे इतरही काही पुराव्यांची दखल घेतली पाहिजे. समर्थांच्या सांगण्यावरून छत्रपतींनी आपल्या राज्याचा ध्वज भगवा केला अशी आख्यायिका आहे. समर्थवाकेनिशीत शके १५७७ मध्ये छत्रपतींनी राज्य अर्पिल्याचा उल्लेख आहे. भगव्या ध्वजाच्या आख्यायिकेला एका ऐतिहासिक पत्रातून पुष्टी मिळते. छत्रपतींच्या आग्र्यातील आगमनासंबंधीचे पत्र रामसिंगाने शके १५८८ मध्ये पाठविले त्यात छत्रपतींचे निशाण भगवे होते असे लिहिलेले आहे. आग्र्याला जाण्यापूर्वी छत्रपती समर्थांच्या भेटीला गेले होते असा चिटणीसांच्या सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रात उल्लेख आहे. छत्रपतींनी ' दिल्लीस जाणे प्राप्त, कसे करावे ' अशी विचारणा केली त्यावेळी समर्थांनी ' जावे, फत्ते पावाल, संकट दूर होईल. तूर्त प्रसंगे जाणेच प्राप्त आहे ' असे उत्तर दिले. चिटणीसांच्या या हकीकतीला एका परकीय इतिहासग्रंथाचा दुजोरा आहे. छत्रपतींच्या मृत्यूनंतर पंधराच वर्षांनी कास्म द गार्डा या पोर्तुगीज लेखकाचे शिवचरित्र पोर्तुगीज भाषेत प्रसिद्ध झाले. त्यात गार्डाने लिहिले आहे की आग्र्यास जाताना ( शके १५८८ ) जयसिंगाच्या परवानगीने एक रामदासी छत्रपतींनी आपल्या बरोबर घेतलेला होता. शके १५९४ पूर्वीच शिव–समर्थ भेट झालेली होती याचे हे प्रत्यंतर आहे.

श्रीमंत महाराज भोसले यांची बखर : मराठी दफ्तर रुमाल १ ला हा ग्रंथ वि. ल. भाव्यांनी प्रसिद्ध केलेला आहे. त्यात प्रतापगडाचा इतिहास दिलेला आहे. तुळजापूरच्या देवीची स्थापना रायगडी करावी असा








विचार शके १५७५ मध्ये छत्रपतींच्या मनात आला. त्याप्रमाणे मंबाजी गोमाजी नाईक सोनवणी यास गंडिकेस पाठवून त्यांनी उत्तम शिळा आणवल्या. ढोरप्या डोंगरावर किल्ला बांधून त्यावर आपली स्थापना करावी असा देवीने महाराजांच्या स्वप्नात दृष्टांत दिला असा बखरीत उल्लेख आहे 'रामवरदायिनी माता' तुळजाभवानी हे समर्थकुलाचेही दैवत होते. 'रामवरदायिनी माता। दासे धुंडून काढिली।' या समर्थांच्या उद्गारावरून हे सिद्ध होते की तुळजाभवानी पारघाटी येऊन राहिलेली आहे हे समर्थांकडूनच छत्रपतींना समजले. तिचा शोध घेऊन तेथेच गड बांधण्याची महाराजांनी मोरोपंत पिंगळयाना आज्ञा केली. शके १५७९ मध्ये प्रतापगडावर देवीची स्थापना करण्यात आली. तिची सविस्तर हकीकत बखरकाराने दिलेली आहे. 'श्री देवीची स्थापना करावयाचा मुहुर्त पाहून मोठें मोठे शिष्ट ब्राह्मण व रामदास स्वामी असे सहीत येऊन मुहुर्ताची सिद्धता म्हणजे नेम केला.' समर्थांच्या सांगण्यावरून मोरोपंत पिंगळयांच्या पत्नीच्या हस्ते देवीची स्थापना झाली. 'ढोरप्या डोंगराचा किल्ला बांधल्यावर त्या किल्ल्याचे नाव प्रतापगड असे ठेवले' जावळीच्या प्रदेशावर मिळवलेले स्वामित्व हा छत्रपतींच्या जीवनातील पहिला मोठा आणि महत्त्वाचा विजय होता. जावळीचे स्वामित्व म्हणजे सह्याद्रीच्या सर्वांत दुर्गम भागाचे व समुद्रकिनाऱ्याचे आधिपत्य! या विजयाने छत्रपतींच्या स्वराज्यात दुपटीने वाढ झाली रायरी (रायगड), चंद्रगड, मकरंदगड, सोनगड व कोंकणच्या साऱ्या वाटा यावर छत्रपतींचे नियंत्रण निर्माण झाले. या अत्यंत महत्त्वाच्या प्रदेशात पहिला किल्ला छत्रपतींनी बांधला आणि विजयाचे प्रतिक म्हणून त्याला प्रतापगड असे नाव दिले. देवीच्या गडावरील स्थापनेच्या वेळीच समर्थांनी तिचे स्तोत्र रचलेले असावे. 'दुष्ट संहारिले मागे ऐसे उदंड ऐकिले। परंतु रोकडे काही मूळ सामर्थ्य दाखवी॥' अशी प्रार्थना त्यानी देवीला केली. देवदेवतांचे रक्षण करणाऱ्या श्रीरामाचा उत्सव नाना संकटाचे निवारण करुन तिने रक्षिला. तिच्या कृपेमुळेच 'मत्पराधीनता गेली सत्ता उदंड चालली।' अशी प्रतीति समर्थांना आली. दुष्ट संहारण्याच्या पूर्वीचे हे स्तोत्र आहे. त्यावेळी छत्रपतींच्या प्रभावाला नुकतीच सुरुवात झालेली होता.

त्यावेळी समर्थांनी देवीजवळ एकच मागणे मागितले आणि ते म्हणजे हिंदवी स्वराज्य निर्माण करू पाहणाऱ्या छत्रपतींना उदंड यश देण्याचे! 'तुझाचि वाढवी राजा शीघ्र आम्हाचि देखता।' यातील राजा हा शब्द छत्रपतींनाच उद्देशून आहे. आपल्या देखतच स्वराज्यसाधन होऊन धर्मसंस्थापना व्हावी अशी निकड समर्थांना लागलेली होती. 'तुळजावरांचेनि गुणे रामे रावण मारिला।' म्हणून छत्रपतींच्या द्वारे तुळजामातेने तेच कार्य करावे अशी समर्थांची उत्कट प्रार्थना होती. शके १५७९ मध्ये प्रतापगडावर देवीची स्थापना झाली तेव्हा छत्रपतींनी शत्रूवर विजय मिळवण्यापूर्वी समर्थांनी हे स्तोत्र रचलेले आहे. त्यावरून शिव-समर्थ भेट शके १५९४ पूर्वीच झालेली आहे.

शिवराज्याभिषेकाच्या वेळी समर्थ रायगडावर उपस्थित नव्हते त्याअर्थी त्यांचे संबंध फारसे दृढ नव्हते असा निष्कर्ष फाटकांनी काढलेला आहे. राज्याभिषेकापूर्वी छत्रपतींचा व्रतबंध झाला त्यावेळी समर्थ उपस्थित होते असे शिवदिग्विजयकाराने लिहिलेले आहे. 'श्री रामदास स्वामीकडे कारकून पाठविले, विनंती केली, त्यांनी अनुमोदन दिल्हे' असे चिटणीसाने राज्यारोहणवृत्तांताच्या संदर्भात लिहिलेले आहे. बखरवृत्त प्रमाण न मानता राज्याभिषेकाच्या वेळी समर्थ उपस्थित नव्हते असे मानले तरी त्यामुळे शिव-समर्थ संबंध दृढ नव्हते असे म्हणता येणार नाही. महात्मा गांधी आणि स्वा. सावरकर हे भारतातील निःशस्त्र व सशस्त्र प्रतिकाराचे सर्वश्रेष्ठ प्रणेते भारताच्या स्वातंत्र्यदिनी दिल्लीमध्ये उपस्थित नव्हते म्हणून भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाशी त्यांचा काही संबंध नव्हता असा निष्कर्ष जर कोणी काढला तर तो फारच हास्यास्पद ठरेल. महापुरुषांच्या मनोवृत्ती फार वेगळ्या असतात. 'साकडीमधे वर्तू जाणे। उपाधीमधे मिळू जाणे। अलिप्तपणे राखू जाणे। आपणासी॥' हे समर्थांनी सांगितलेले महंतलक्षण फाटकांनी नीट ध्यानात घ्यावे.

## शिव-समर्थ भेटीविषयी निर्णायक पुरावा

शिव-समर्थ भेटीविषयीचा निर्णायक पुरावा म्हणजे अंताजी गोपाळ देशकुलकर्णी, कुडाळकर याने माघ व. १३ शके १६०३ या दिवशी लिहून ठेवलेले सम-








र्थांच्या जीवनातील प्रमुख घटनांचे टिपण ! समर्थांनी छत्रपतींना अनुग्रह दिल्याचा नेमका दिवस त्यात सांगितलेला असल्यामुळे फाटकांची फारच गैरसोय झाली त्या टिपणाचा मोघम उडता उल्लेख करून त्यातील विधानांचे खंडन करण्याची जबाबदारी टाकलेली आहे. 'शेंडा बुडखा नसलेला कपटा' या शब्दात तुच्छतेने वाकेनिशी टिपणाचे वर्णन त्यानी केलेले आहे. सत्यशोधनाला चालना देणारा प्रत्येक कपटा इतिहासकाराच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा असतो. उत्खननात सापडलेल्या वस्तू फुटक्या असल्या तरी खऱ्या आणि बहुमोल असतात हे फाटकासारख्या थोर इतिहास संशोधकाना सांगण्याची वेळ यावी हे मोठेच दुर्दैव ! दिवाकर गोसाव्याच्या सांगण्यावरून जरी ते टिपण तयार केलेले असले तरी त्याने ते पाहिले नाही, कारण तो समर्थांच्या मृत्यूसमयी त्यांच्याजवळ नव्हता असे फाटकांचे म्हणणे. समर्थांच्या मृत्यूनंतर २५ पेक्षा अधिक वर्षे जगलेल्या दिवाकराने वाकेनिशी टिपणाकडे ढुंकूनही पाहिले नाही हे कसे शक्य आहे ? दिवाकराच्या सांगण्यावरून टिपण तयार झालेले असल्यामुळे त्याने ते पाहिलेले असणार हे निश्चित ! शिवाय वाकेनिशी टिपणातच नमूद केलेले आहे की पांच दिवसाचा अवधी आहे असे समर्थांनी शिष्यांना सांगितल्यानंतर त्यांच्या तोंडून जे जे उद्गार निघाले ते भक्तमंडळी व दिवाकर गोसावी यांनी लिहून ठेवले. दिवाकर गोसावी समर्थांचा अंतकाळ ओढवला तेव्हा त्यांच्याजवळ होता असे त्या टिपणातूनच सूचित झाले आहे. शिव-समर्थ भेटीविषयी स्पष्ट निवेदन टिपणात आहे की 'शिवाजीमहाराज यांस आनुग्रह शके १५७१ शिंगणवाडीचे बागेत वैशाख शुद्ध नवमी गुरुवारी झाला.' या स्पष्ट पुराव्याच्या बाबतीत फाटकांनी धूर्तपणे मौन पाळलेले आहे. थोड्याशा दुबळ्या पुराव्यापुढे अरेरावी करणे आणि बळकट पुराव्यापुढे अनुल्लेखाचा अवलंब करणे किंवा मौन पाळणे ही फाटकांची खास हिकमत आहे.

राजकीय जागृती हे समर्थांच्या सर्वांगीण कार्याचे एक अंग कसे होते याचे विवेचन एका स्वतंत्र लेखात करण्याचा विचार आहे.

---










प्रा. गोवर्धन पारीख

# भारतीय बुद्धिमंतांचे अपनयन

भारतीय बुद्धिमंतांच्या अपनयनाविषयी [ Brain Drain ] अलीकडे आम्हास थोडीफार जाणीव होऊ लागल्याचे दिसत आहे. तथापि यावाबतच्या प्रतिक्रिया अजून तरी बऱ्याचशा मामुली व वरवरच्याच असल्याचे दिसून येते. उलट हा प्रश्न मात्र दिवसेंदिवस अधिकाधिक उग्र स्वरूप धारण करीत आहे. उच्च शिक्षण किंवा औद्योगिक, व्यावसायिक वा तत्सम अनुभव घेण्याच्या निमित्ताने परदेशात जाणाऱ्या भारतीयांची संख्या वाढत आहे; आणि तशीच गेल्यानंतर तेथेच स्थायिक होणारांचीही. इंग्लंड-अमेरिकेच्या बाबतीत हे दृश्य चटकन नजरेत भरते; इतरत्रही अशी उदाहरणे आढळतात. थोडासा बारकाईने विचार केल्यास ही आमची आजची एक महत्वाची समस्या आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय नसावा.

या प्रश्नाविषयी जाणीव होण्याचे कारण काही अंशी बदललेल्या सामाजिक परिस्थितीत आहे असे म्हणता येईल. परदेशात स्थायिक झालेल्या भारतीय बुद्धिमंतांची, ज्ञानविज्ञानाच्या वा विविध सामाजिक क्षेत्रात कर्तृत्व गाजविणाऱ्या व्यक्तींची, उदाहरणे आजवर दिसत नव्हती असे नाही. पण एकतर ती अगदी थोडी असत. आणि दुसरे म्हणजे आमचे लक्ष राष्ट्रीय स्वातंत्र्यप्राप्तीवर केंद्रित झालेले होते. यामुळे राजकीय लढ्याला धार यावी या हेतूने परदेशात कार्य करणारांना एक प्रकारचे आगळेच महत्त्व येई. अन्य क्षेत्रातील कर्तृत्वाकडे दुर्लक्ष होत होते असे नाही. परंतु त्याचाही उपयोग सामान्यतः राजकीय भूमिकेला पुष्टी यावी यासाठीच होत असे. " संधी मिळाल्यास इतरांपेक्षा आम्ही कमी नव्हत; पण संधीच नाही तिथे काय करणार, " असा निष्कर्ष त्यावरून निघे. यामुळे अशा व्यक्तींचे परदेशातील वास्तव्य सहसा खटकले नाही.

आता ही परिस्थिती बदलली आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर विकासकार्याला आरंभ झाला, व या कार्याचा व्याप प्रत्यही वाढत आहे. यामुळे निरनिराळ्या क्षेत्रातील व विशेषतः विज्ञान, तंत्रविद्या, स्थापत्य, वैद्यक, व्यवस्थापनशास्त्र इत्यादि क्षेत्रातील कुशल व जाणकार व्यक्तींची गरजही वाढते आहे. वाढत्या विकासकार्यासाठी आवश्यक मनुष्यबळ लाभावे याकरिता शैक्षणिक संस्था व सवलतींची वाढही होत आहे. वाढती गरज व वाढता पुरवठा यामध्ये पुरेसा मेळ घातला गेलेला नाही हे खरे. परंतु गरजेची जाणीव निर्माण झाल्यामुळे मनुष्यबळ कमी होणे ही कल्पना चिंतादायक वाटणे स्वाभाविक आहे. आणि नेमकी हीच गोष्ट आता वाढत्या प्रमाणात घडू लागली आहे.

बुद्धिमंतांचे अपनयन हे इष्ट, अनिष्ट की दुर्लक्षिता येण्यासारखे मानावयाचे यासंबंधी निरनिराळे दृष्टिकोण आढळतात. सामान्यतः ते सर्वस्वी इष्ट होय असे म्हणताना कोणीही आढळत नाही. परंतु परदेशात कायमचे वास्तव्य करणारे सारेच मोठे कर्तृत्ववान आहेत असे नाही; अगदी प्रथम श्रेणीच्या प्रभावी व कर्तृत्ववान व्यक्तीव्यतिरिक्त त्यात कित्येक द्वितीय वा तृतीय श्रेणीच्या व्यक्तींचाही भरणा आढळतो. ही माणसे तेथेच कायमची राहिली तरी फारसे काही बिघडत नाही. येथे येऊनही ती विशेष काही करू शकतील असे नाही, असे मात्र काहींना वाटते. व " परदेशात राहिली तर उत्तम, तेथेच राहू देत " असे म्हणण्यापर्यंतही जाण्याची त्यांची तयारी असते. अर्थात्, या दोन्ही गटात अगदी अपूर्व कार्य करणाऱ्या वा शोध लावणाऱ्या व्यक्तींचा समावेश नसतो परंतु अशा शोधात वा कार्यात एक प्रकारचा आकस्मिकपणाही असतोच. म्हणून त्यांच्याविषयी प्रस्तुत संदर्भात विशेष चिकित्सा करण्याचे कारण नाही.

हा दृष्टिकोण निर्विवादपणे स्वीकारणे कठीण आहे. उच्च शिक्षणापुरतेच बोलायचे झाल्यास प्रथम श्रेणीतील व्यक्ती परदेशात राहण्याऐवजी परत आल्यास येथील शिक्षणाचा व संशोधनाचा दर्जा सुधारण्यास मदत होईल व भावी पिढ्यांची गुणवत्ता सुधारू लागेल हे उघड








आहे. परंतु व्यापक राष्ट्रीय विकासाच्या दृष्टीने आपणास सर्वच श्रेणीतील व्यक्तींची गरज आहे. प्रथम श्रेणीची माणसे हवीत, इतर हवी तितकी मिळू शकतात अशी आजची अवस्था नाही. यामुळे ती परदेशात राहिली तरी चालेल असे निश्चितपणे म्हणता येत नाही. उलट अपूर्व संशोधनसामर्थ्य वा कर्तृत्व असलेली व्यक्ति, आपल्या कार्याला भरपूर वाव मिळेल अशा ठिकाणी वास्तव्य करून राहिल्यास बिघडत नाही; इतरानी मात्र परत येणेच इष्ट होय अशी भूमिकाही घेता येणे शक्य आहे. आजचे विज्ञान हे काही संरक्षण वा तत्सम राष्ट्रीय हिताच्या बाबी व त्यातून उद्भवणाऱ्या मर्यादा सोडल्यास, जागतिक स्वरूपाचेच आहे. त्यामुळे अशा कर्तृत्ववान व्यक्तींच्या कार्याला देशात पुरेशी संधी मिळत नसल्यास त्यानी अन्यत्र कार्य करीत राहिल्याने विशेष नुकसान होईल असे नाही. त्यानी अन्यत्र राहावे की नाही, याऐवजी त्यांच्या पातळीवरील कामाला पुरेसा वाव आहे की नाही, नसल्यास तो कसा देता येईल हेच प्रश्न अधिक महत्वाचे ठरतात.

येथे एक मुद्दा ध्यानात घेणे जरूर आहे. बुद्धिमंतांचे अपनयन इष्ट नव्हे असे म्हणताच ते अनिष्ट होय असा चटकन निर्णय निघेलच असे नाही. याबाबतची खरी अडचण काहीशी निराळी आहे. निरनिराळ्या राष्ट्रात बुद्धिमंतांची येजा कायम राहाणे, किंबहुना आजच्या परिस्थितीत ती वाढत जाणे, बौद्धिक जीवन उंचावण्यासाठी आवश्यक व इष्टच होय. तथापि ही येजा दुतर्फी असली पाहिजे. तशी ती असल्यास एकूण परिस्थितीचा साकल्याने दीर्घकालीन आढावा घेता अधिक व्यक्ती देशात येतात की देशाबाहेर जातात हाच प्रश्न शिल्लक राहतो; व त्यावर मर्यादित उपाययोजना करणे आवश्यक ठरते. आमची परिस्थिती तशी नाही. देशात येणारांची संख्या अत्यंत थोडी. व तीही बहुधा या ना त्या विशिष्ट विकासकार्याच्या 'तांत्रिक' गरजा पुऱ्या करण्यासाठी येणाऱ्या तज्ञांची. शिक्षणक्षेत्रातील सार्वराष्ट्रीय संघटना, फौन्डेशन्स, सरकार वा विद्यापीठ अनुदान मंडळाने स्वीकारलेल्या शैक्षणिक विनिमयाच्या योजना यांच्या अनुसार जी काही मूठभर तज्ञ मंडळी येत असतील ती. तात्पर्य, आमच्या बाबतीत, या देवघेवीचे स्वरूप दुतर्फी नाहीच. येथे प्रश्न बव्हंशाने एकतर्फी बाहेर जाणारांचाच आहे. आणि यामुळेच त्याचे स्वरूप किती तरी अधिक गंभीर आहे व प्रत्यही ते अधिकाधिक कठिण होत आहे. त्याकडे दुर्लक्ष करणे आत्मघातकीपणाचे ठरेल असे वाटते.

तर मग परदेशात जाऊन स्थायिक होऊ पहाणारांना सक्तीने परत का बोलावू नये असा यावर सहजच प्रश्न निर्माण होतो. व्यापक राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अशी सक्ती करण्यास काय हरकत आहे ? ही कल्पना सकृद्दर्शनी योग्य व सहजच पटण्यासारखी वाटते. ती व्यवहार्यही आहे, अर्थात् तांत्रिक अर्थाने. भारतीय पासपोर्टवर ही मंडळी बाहेर जातात व त्याना परत बोलावण्याचा अधिकार सरकारने राखून ठेवलेला असतो. त्या अधिकाराचा वापर करण्यास काय हरकत आहे ? तथापि ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाही. एकतर त्यासाठी परदेशात जाणाराची केवळ यादीच नव्हे तर ज्या हेतूने ते जातात त्या हेतूच्या पूर्ततेच्या दृष्टीने त्यांच्या कार्याच्या प्रगतीचा आढावा घेणारी यंत्रणा निर्माण करावी लागेल व ही यंत्रणा परदेशात उभारायची असल्याने तिचा खर्च परकीय चलनातच करावा लागेल. शिवाय, काही वेळा या हेतूचे स्वरूपच असे असते की त्याची पूर्तता झाली किंवा नाही हे ठरवणेही सोपे नाही. पदव्युत्तर शिक्षण घेण्यासाठी जाणारा संशोधनासाठी राहतो वा संशोधनासाठी जाणारा अनुभवाच्या निमित्ताने मुक्काम लांबवतो. अनुभव केव्हा पुरेसा झाला हे ठरवणे मुळीच सोपे नाही. काही विशिष्ट अटी पुऱ्या झाल्या की त्या देशात नोकरी मिळणेही कठिण जात नाही; व त्यामुळे येथून खर्चासाठी पैसे मागवण्याचाही प्रश्न शिल्लक राहात नाही. तात्पर्य सक्तीचा मार्ग वाटतो तितका सोपा नाही. उलट दुसऱ्या दृष्टीने विचार केल्यास तो धोक्याचा व आक्षेपार्हही आहे असे म्हणावे लागते. परदेशात वास्तव्य करू पाहणाऱ्या या व्यक्तींच्या कार्याचे स्वरूपच असे असते की सक्तीचा त्यांच्या क्षमतेवर परिणाम होणे अपरिहार्य व्हावे. विशेषतः मौलिक संशोधनकार्याविषयी तर हे निश्चितपणानेच म्हणता येईल. हीच गोष्ट अन्य संशोधनाबाबतही बव्हंशी खरी आहे. हा झाला सक्तीच्या मार्गातला धोका. आणि लोकशाहीच्या भूमिकेवरून या प्रश्नाकडे पाहिल्यास तो मार्ग आक्षेपार्हही आहे. जेथे वास्तव्य करावयाचे त्या राष्ट्रांचा आक्षेप नसल्यास सक्तीचा



अनुक्रमणिका






प्रश्न उद्‌भवत नाही; आक्षेप असल्यास परत बोलावणे हा सक्तीचा विषय राहत नाही, उलट राष्ट्राने आपल्या नागरिकांना द्यावयाच्या संरक्षणाचा तो एक भाग बनतो. सक्तीने परत बोलावण्याची कल्पना एकदा मान्य केली की बाहेर जाण्यावर बंधने लादण्याची कल्पना आपोआप येतेच. हुंडणावळीच्या तात्कालिक अडचणीतून निर्माण होणारी बंधने वेगळी आणि राष्ट्रीय धोरणाचा एक भाग म्हणून बंधने लादण्याची कल्पना वेगळी. या दुसऱ्या प्रकारच्या बंधनांचा स्वीकार करावयाचा म्हटल्यास त्यातून परिणामी सर्व श्रमशक्तीच्या नियंत्रणाची व राजकीय निर्णयाच्या योगाने तिचा विविध कामात उपयोग करण्याची कल्पना (Direction of Labour Force) व्यवहारात येणे अपरिहार्य होईल. ही कल्पना हे हुकूमशाही राजवटीचे एक महत्वाचे लक्षण होय हे प्रसिद्धच आहे. तात्पर्य सक्तीचा मार्ग हा सर्वथैव अनिष्ट होय हे मान्य करणे प्राप्त आहे.

सक्ती करावयाची नाही म्हटले की पुरवठावाढीचा प्रश्न पुढे येतो. निरनिराळ्या क्षेत्रातील तरुण, हुशार, कर्तबगार व्यक्ति परदेशात राहतात, गेल्यानंतर परत येत नाहीत व यामुळे देशातील शैक्षणिक व अन्य विकासकार्यांत अडचणी निर्माण होतात, असे असेल तर देशातील अशा व्यक्तींचा पुरवठा वाढविणे हा त्यावर योग्य उपाय नव्हे काय, असा हा प्रश्न आहे. याचे उत्तर निरपवादपणे 'होय' असेच द्यावे लागेल. तथापि तात्विक दृष्ट्या योग्य असले तरी ते आजच्या परिस्थितीत व्यवहार्य नाही. देशात उच्च शिक्षणासकट सर्वच शिक्षणक्षेत्राची झपाट्याने वाढ होत आहे खरी. तथापि त्याबरोबरच निरनिराळ्या ज्ञान-विज्ञान शाखातून शिक्षण घेऊन तयार होणाऱ्या व्यक्तींसाठी मागणीही झपाट्याने वाढत आहे. व या दोहोंमध्ये मेळ घालणे अत्यंत कठिण व जिकिरीचे काम झाले आहे. प्रत्यक्षात असलेली व विकासाच्या दृष्टीने अपेक्षित मागणी ध्यानात घेता पुरेसा पुरवठा ही एक अत्यंत कठिण बाब होऊन बसली आहे. अन्य साधनांच्या मानाने विकासकार्यासाठी आवश्यक तयारी व क्षमता असलेली माणसे निर्माण करणे हे अधिक कष्टाचे, जिकिरीचे व कालावधीत पुरे होणारे काम असते हे प्रसिद्ध आहे. ते योग्य प्रकारे व्हावयाचे झाल्यास केवळ शिक्षणप्रसार होऊन भागत नाही. शिक्षणप्रसार योग्य, आवश्यक व इष्ट होय याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही. परंतु केवळ प्रसारावर भर देणे परिणामी आत्मघातकीपणाचेही ठरण्याचा संभव आहे प्रसाराच्या योगाने शिक्षणाच्या दर्जाला धक्का पोहोचणार नाही; बाध येणार नाही याचीही सर्व दखल घेतली पाहिजे. आमच्या आजच्या परिस्थितीत तरी हे काम अत्यंत कठीण होऊन बसले आहे असाच या क्षेत्रात कार्य करणारांचा अनुभव आहे. यामुळे देशाबाहेर वास्तव्य करण्याची, तेथेच कायमचे राहण्याची प्रवृत्ति बुद्धिमंतांच्या ठिकाणी वाढत असली तर वाढू देत; अशा व्यक्तींचा देशातील पुरवठा वाढवून हा प्रश्न सोडवता येईल ही भूमिका ग्राह्य असली तरी व्यवहार्य वाटत नाही. हा प्रश्न जाणीवपूर्वक दुर्लक्ष करण्यासारखा नाही. शिक्षणाच्या दर्जात आजच्यापेक्षा कितीतरी सुधारणा झाल्यावाचून तसे करता येणार नाही.

वरील विवेचनावरून या प्रश्नाचे स्वरूप अधिकाधिक उग्र होत असून तो सोडवणे कसे आवश्यक आहे हे सहज ध्यानात येईल. तर मग त्यावर उपाय काय ? असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. ही उपाययोजना सुचवणे सोपे नाही. त्यासाठी प्रथम या समस्येचा योग्य उकल झाला पाहिजे. या दृष्टीने आज उपलब्ध असलेली माहिती अत्यंत अपुरी, वरवरची, विशिष्ट समजुती वा ग्रह यावर आधारलेली अशीच आहे व तिच्या आधाराने अप्रनयनाची कारणे शोधू पाहाणे म्हणजे काही कयास बांधणे होय. यापेक्षा त्याला अधिक महत्त्व देता येणार नाही. अशा कयासांची यथार्थता ते बांधणारांच्या आकलनावर अवलंबून राहणार हे उघड आहे. जाणत्या व्यक्तींचे कयासदेखील काहीवेळा चुकीचे ठरण्याचा संभव असतो हे निर्विवाद होय. परदेशात गेलेल्या व तेथेच दीर्घकालपर्यंत किंवा कायमचे वास्तव्य करून राहिलेल्या भारतीयांची आम्हास फारच थोडी माहिती आहे. अशी माणसे किती आहेत, कोठे आहेत, कोणकोणत्या क्षेत्रात आहेत, ती परत येण्याऐवजी तेथेच का राहातात यासंबंधी माझ्या माहितीप्रमाणे आजतरी आम्हास फारसे काहीच माहीत नाही. यासंबंधी निदान इंग्लंड व अमेरिकेपुरती का होईना पण भारतीय वकिलातींच्या साहाय्याने एखाद्या विद्यापीठाने विस्तृत स्वरूपाची पाहणी केल्यास अत्यंत मोलाचे कार्य होईलसे वाटते.








या कार्याचे महत्त्व स्पष्ट व्हावे यासाठी एक अत्यंत ढोबळ, सहज नजरेत भरण्यासारखे उदाहरण देता येईल. देशात डॉक्टरांची संख्या कमी आहे, आजच्या मानाने कितीतरी अधिक डॉक्टर निर्माण होणे जरूर आहे, ग्रामीण भागातील वैद्यकीय साहाय्याचा प्रश्न तर अत्यंत निकिरीचा झाला आहे इत्यादि गवगवा आपण सतत ऐकत असतो. मध्यंतरी राष्ट्रीय आणीबाणीच्या काळात तर या प्रश्नाला संरक्षणदृष्ट्याही महत्त्व येऊ लागले होते; कारण संरक्षणकार्यासाठी पुरेसे डॉक्टर मिळणे कठिण होईलशी भीती व्यक्त केली जात होती. वैद्यकीय शिक्षणाच्या दर्जाची किमान पातळी कायम राखण्याची जबाबदारी "इंडियन मेडिकल कौंसिल" या संघटनेवर आहे. तथापि निरनिराळ्या महाविद्यालयातील जागा, साधनसामुग्री, शिक्षकसंख्या इत्यादींचा कसलाही विशेष विचार न करता प्रत्येक महाविद्यालयात दोनशे विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जावा अशी कौंसिलने शिफारस केली; व त्यामुळे साहजिकच कित्येक ठिकाणी संख्यावाढ करण्यात आली. नवी महाविद्यालये काढणे खर्चाचे. अनेक ठिकाणी त्यासाठी आवश्यक तरतूद करण्याची अडचण ध्यानात घेऊन हा खर्च विद्यार्थ्यांनीच अंशतः सोसावा असे धोरण स्वीकारण्यात येऊन खाजगी प्रयत्नांनी अशी महाविद्यालये काढण्यात यावीत व त्यांनी फी व्यतिरिक्त प्रवेश देताना विद्यार्थ्यांकडून प्रत्येकी सात आठ हजार रु० देणगीच्या रूपाने घ्यावेत ही कल्पना मान्य केली गेली. वैद्यकीय पदवीच्या शिक्षणासाठी प्रत्येक विद्यार्थ्यामागे सुमारे पंचवीस ते तीस हजार रु० खर्च होतो हे प्रसिद्ध आहे. हा झाला सर्व एक बाजूचा खटाटोप! आता दुसऱ्या बाजूने विचार केल्यास हे शिक्षण घेणारांचे काय होते? असा प्रश्न येतो. ब्रिटनमधील राष्ट्रीय आरोग्ययोजनेत काम करीत असलेल्या भारतीय डॉक्टरांचे प्रमाण सुमारे तीस ते पस्तीस टक्के इ० असल्याचे अनेक जाणकार व्यक्ती सांगतात. भारतीय डॉक्टरांनी परत जावयाचे ठरविल्यास ही योजनाच बारगळेल अशी साधार भीती व्यक्त केली जाते. या वस्तुस्थितीचा अर्थ काय? तिच्यासंबंधी आम्ही कितीसा विचार करतो? आमची झोपाळु वृत्ति कौतुकास्पदच (!) म्हटली पाहिजे.

अपनयनाच्या कारणांचा विचार करताना एक कल्पना पुढे मांडली जाते ती अशी : देशात ज्याप्रमाणे ग्रामीण भागांकडून शहरांकडे जाण्याची प्रवृत्ति बुद्धिमंतांच्या ठिकाणी सातत्याने आढळते तशाच स्वरूपाची हीही प्रवृत्ति आहे. दोहोंची कारणे बव्हंशी सारखीच आहेत. शहरात चरितार्थाची साधने प्राप्त होण्याचा संभव अधिक, आणि वाढत्या राहाणीच्या खर्चाच्या मानाने ती अधिक विपुलही असतात. कित्येक वेळा संपादित ज्ञान वा कौशल्य खेड्यात उपयोगात आणणे अशक्य म्हणून शहरात राहणे अपरिहार्यही ठरते. शहरी वातावरणात एक प्रकारचा मोकळेपणा असतो; कर्तृत्वाला अधिक वाव मिळतो; मनात आणल्यास आपल्याच कामात दंग होता येते. बौद्धिक, शैक्षणिक वा व्यावसायिक कामे सभोवताली सतत सुरू असतात आणि स्वतःच्या वा अन्य कोणत्याही क्षेत्रातील कार्यात भाग घेण्यास भरपूर वाव असतो. तात्पर्य, ज्या निरनिराळ्या कारणामुळे माणूस ग्रामीण भागाकडून शहरांकडे आकर्षिला जातो तीच कारणे तो देशाबाहेर वास्तव्य करू लागण्यासही जबाबदार आहेत. असे म्हणता येईल.

हे निदान सर्वस्वी खरे नाही. देशातल्या देशात वा त्यातील एकाद्या प्रदेशात खेड्यातून शहरात जाऊन राहाणे आणि देश सोडून दुसऱ्या देशात कायमचे वास्तव्य करणे यात मौलिक भेद आहे. अशा प्रकारे वास्तव्य करण्यात व्यक्तीस कितीतरी अधिक प्रमाणात मानसिक ताण सहन करावा लागतो हे उघड आहे. जुने संबंध तोडणे व नवे जोडणे या दोन्ही गोष्टी मानसिक दृष्ट्या त्रासाच्याच. विशिष्ट मुदतीनंतर राहावयाचे म्हणजे नागरीकत्वाचाही प्रश्न निर्माण होतो. मन घराभोवती, गावाभोवती, देशाभोवतीच घोटाळत असते. नागरीकत्व स्वीकारल्याने परकीय जीवनाशी एकरूप होता येतेच असे नाही. परदेशात आपल्या कर्तृत्वानुसार योग्य व न्याय्य स्थान नेहमी मिळेलच असेही नाही. शिवाय, उत्पन्न अधिक असले तरी खर्चही वाढतोच. परकीय वातावरणात जीवन फारसे लवकर स्थिरावत नाही; त्यामुळे काही काल तरी त्याला भ्रमणाचे स्वरूपच आलेले असते. तात्पर्य परदेशात कायमचे वास्तव्य करावयाचे म्हणजे त्यासाठी बरेच मोठे

भावनिक मोल द्यावे लागते हे उघड आहे. इतर अडचणीही त्यात आहेतच.

अपनयनाच्या कारणांचा आता काहीशा विस्ताराने विचार करणे आवश्यक आहे. काही ठोकळेबाज पद्धतीने विचार करणारी मंडळी " आमच्या तरुणांच्या ठिकाणी राष्ट्रप्रेमाचाच अभाव आहे. देशात या अभावामुळे निरनिराळे प्रश्न निर्माण होत असलेले आम्ही पाहातो. हा प्रश्न म्हणजे ज्यांना परदेशात जाण्याची संधी मिळाली त्यांच्या वर्तनात आढळणारा तसलाच एक प्रकार आहे; " असे म्हणताना आढळतात. परंतु या निदानामुळे या प्रश्नाबाबत कोणताही मार्ग दिसत नाही. केवळ एका संबंध पिढीची अवहेलना होते इतकेच. क्षणभर वादाकरिता ही अवहेलना समर्थनीय म्हटली तरी त्याबद्दलची जबाबदारी, मला वाटते, वडीलधाऱ्या मंडळींच्या शिरावरच टाकावी लागेल. आणि राष्ट्रप्रेम नसल्यास ते निर्माण कसे करता येईल याचा विचार करणे क्रमप्राप्त होईल. थोरामोठ्यांकडून याबाबत घालून दिली जाणारी उदाहरणे कितपत योग्य व उत्तेजनार्ह आहेत याचे प्रामाणिक उत्तर शोधावे लागेल. केवळ भाववश होऊन वक्तव्य केल्याने हा प्रश्न सुटण्याचा सुतराम् संभव नाही. नेहमीच्या परिस्थितीत अपनयनाची समस्या सोडविण्यासाठी राष्ट्रप्रेम पुरेसे पडेल की नाही हाही एक प्रश्नच आहे. यामुळे या सुलभ स्पष्टीकरणाच्या दिशेने न वळणे हेच उचित म्हटले पाहिजे.

परदेशात वास्तव्य करून राहिलेले भारतीय तिकडे प्रथम गेले ते बहुधा उच्च शिक्षणाच्या निमित्तानेच. देशातल्या देशात निरनिराळ्या क्षेत्रात हे शिक्षण घेणे आता शक्य होत आहे. तथापि कित्येक क्षेत्रात अजूनही या सवलती मर्यादित प्रमाणातच आढळतात. म्हणून काहीना परदेशात जावे लागते. जेथे देशात सवलती आहेत तेथे ही जाणारी मंडळी थोडीशी अत्यंत बुद्धिमान व बरीचशी मध्यम श्रेणीतली पण बहुधा ' श्रीमंत ', निदान परदेशातील शिक्षणाचा काही काळ तरी खर्च झेपू शकेल इतपत सधन, असतात. आणि तेथेच वास्तव्य करून राहाण्याची या दोहोंची कारणे भिन्न असल्याचे दिसून येते. बुद्धिमान तरुणांच्या तेथील शैक्षणिक प्रगतीमध्ये येथील परिस्थिती व गरजा यांच्याशी त्याचा सांधा तुटतो. त्याच्या क्षेत्रातील वा त्याच्या पातळीवरील व्यक्तीला येथे परत यावयाचे म्हटल्यास कार्यक्षेत्र दिसत नाही. त्याने परत येऊन ते निर्माण का करू नये असा प्रश्न काही वेळा विचारला जातो. पण एकतर तसे करणे सोपे नाही. त्यासाठी पुरेशी साधनसामुग्री व लवचिक कार्यपद्धती असलेल्या शिक्षणसंस्था नाहीत. सर एरिक ॲशबी यानी एकदा असे म्हटल्याचे सांगतात की " भारतीय विद्यापीठे एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला स्थापन झाली आणि आफ्रिकेतील विद्यापीठे विसाव्या शतकाच्या मध्याला. दोहोंचा आदर्श ब्रिटिश विद्यापीठे हा खरा, पण आधुनिक दृष्टिकोणातून व कार्यपद्धतीच्या दृष्टीने भारतीय विद्यापीठे निदान शंभर वर्षे तरी मागे आहेत. " आणि या विधानात बरेच तथ्यही आहे. केवळ परीक्षा घेऊन पदवी देणारी संस्था हीच अजून विद्यापीठांविषयी आमची बव्हंशी समजूत आहे. अध्यापन-संशोधन कार्यास महत्व प्राप्त होऊ लागले असले तरी त्यावर अद्यावतपणा व आधुनिकता यांचा विशेष प्रभाव पडलेला नाही असेच म्हणावे लागते. येथे परत येऊन प्रथम श्रेणीच्या या बुद्धिमंतांनी आपापले कार्यक्षेत्र निर्माण करावयाचे म्हटल्यास आणखीही एक अडचण येते. ज्ञानाच्या क्षेत्रात कार्य करणारांची चर्चा, विचारविनिमय, सहकार्य, साहाय्य इत्यादि कारणांसाठी सभोवताली आपल्याच योग्यतेचे सहकारी असणे ही एक महत्वाची गरज असते; व ती पुरी होऊ शकत नाही अशी कित्येक क्षेत्रे आहेत. यामुळे आपला विकास मंदावेल कामाची गति कमी होईल अशी साधार भीती अनेकांना वाटत असते.

मध्यम दर्जाच्या व्यक्ती परत न येण्याची कारणे यापेक्षा काहीशी भिन्न असावीत असे वाटते. आपल्या क्षेत्रात अगदी प्रथम दर्जाचे नसले तरी महत्वपूर्ण कार्य ही माणसे करीत असतात. येथे आल्यानंतर ते चालू राहील की नाही याबद्दल त्याना शंका असते. प्रथम नोकरी कोठे व कशी मिळणार हा प्रश्न. परदेशात काही काळ घालवल्याकारणाने नोकरीविषयक त्यांच्या अपेक्षाही काहीशा उंचावलेल्या असतात. जेथे काम करावयाचे तेथील एकंदर वातावरणाविषयीही काही शंका असतातच. नोकरी म्हणजे काम करण्याची संधी असे समीकरण मांडण्यास मन धजावत नाही. ढवळाढवळ होईल, कार्यक्षमतेऐवजी अन्य कारणास्तव इतरांचे वर्चस्व स्वीकारावे लागेल, कार्यक्षमतेमुळेच वरिष्ठांची

गैरमर्जी, अगदी अनुकूल वातावरण मिळाले तरी देखील तांत्रिक अडचणी व दिरंगाई यामुळे अडचणी येतील इ. इ. अनेक शंकाकुशंका त्याना भेडसावत असतात आणि त्याची यथार्थता सिद्ध करण्याच्या दृष्टीने आपले बाहेर जाण्यापूर्वीचे व आपल्या स्नेह्यांचे अनुभव ही मंडळी सांगत असतात. ही परिस्थिती सुधारली पाहिजे असे त्याना मनापासून वाटते. " तुम्ही इथे राहिल्याने ती कशी सुधारेल ? " असे विचारले की निरुत्तरही होतात. पण परत येण्यास मात्र धजावत नाहीत. आपण परत येऊन ती सुधारण्यासाठी काही महत्वाचे काम करू शकू असे त्याना वाटत नाही. कर्तृत्ववान व्यक्तीला पुरेसा आत्मविश्वास वाटावा असे वातावरण आमच्या सामाजिक व संस्थात्मक जीवनात आहे काय, याचा विचार होणे जरूर आहे.

अपनयनाची जबाबदारी सर्वस्वी आपल्यावरच आहे; परदेशात वास्तव्य करणाऱ्या व्यक्तींचे वर्णन समर्थनीय आहे असा या प्रतिपादनाचा हेतु नाही. काही वेळा देशात दुय्यम वा तृतीय श्रेणीत असलेल्या परंतु केवळ आवश्यक साधने हाती आल्याने वा असल्याने तेथे गेलेल्या व्यक्तीही आढळतात. काही आपल्या विषयात तर काही, त्यात विशेष गती नसल्याचा प्रत्यय आल्याने, अन्य विषयात सामान्य स्थान मिळवतात, पदव्या संपादन करतात. मात्र काहीवेळा यांच्याही नोकरीविषयक अपेक्षा, केवळ परदेशात गेल्याने वा तेथील एखादी पदवी मिळवल्याने, वाढलेल्या असतात. परत येण्याची त्यांना निश्चितच भीती वाटते. उलट, तेथे काहीना काही काम मिळतच असते. ह्या व्यक्ती परत आल्याने काही विशेष लाभ होईल किंवा काय हा एक प्रश्नच आहे. निदान परत यावयाचे झाल्यास आपल्या पदवीचा अभिमान व अपेक्षांचे गाठोडे त्यांनी तेथेच ठेवून येणे उचित होय, असे म्हणावयास हरकत नाही. केवळ द्रव्यबळ नसल्याने बुद्धिमान तरुणांनी देशातच राहून अध्ययन करावयाचे व ते असल्याने बाहेर जाऊन एखादी सामान्य पदवी मिळवणाराने परत येताच त्याच्याहून पुढे जायची अपेक्षा बाळगायची हे निःसंशय गैर होय. ह्या व्यक्ती तेथे देखील अगदी साधी, प्रसंगी अंगमेहनतीची, कामे करताना दिसतात. येथे परत येऊन येथील जीवनाशी एकरूप होऊन मिळेल ते काम पत्करण्याची तयारी त्यांनी का दाखवू नये ? या गटात काही जण मात्र पुरेसे द्रव्यबळ नसताना देखील, शिक्षण, साहस, नवे अनुभव इत्यादि हेतूंनी प्रेरित होऊन गेलेले आढळतात; व तेथेही सर्व प्रकारच्या अडचणींवर मात करून, संकटांना तोंड देऊन, पुढील मार्ग काढीत असताना आढळतात. अशा व्यक्तींचे शैक्षणिक कर्तृत्व मर्यादित असले तरी मनोधैर्य मात्र वाखाणण्यासारखे आढळते. बहुधा परदेशात कायमचे राहाण्याची त्याना इच्छाही नसते. तथापि तशी इच्छा असल्यास त्याना परत येण्यासाठी अनुकूल वातावरण निर्माण करणे आवश्यक व हिताचे ठरेल असे म्हणता येईल. अपेक्षांची अडचण यांच्या बाबतीत निर्माण होण्याचा संभव कमी आहे. या गटात आणखीही एक तिसरा प्रकार आढळतो. " शिक्षणाच्या दृष्टीने विशेष काही प्राप्त झाले नसले तरी परदेशात येण्यासाठी आपण काही खर्च केला आहे. तेव्हा थोडीफार कमाई करून परत जावे " ही या गटाची भूमिका. यांचा प्रश्न अधिक गुंतागुंतीचा आहे. त्याविषयी येथे चर्चा करण्याची गरज नाही.

अन्यत्र कायमचे राहाणाऱ्यांच्या बाबतीत आणखीही काही मुद्यांचा उल्लेख करणे जरूर आहे. तेथे राहाण्याचा निर्णय घेताना द्याव्या लागणाऱ्या भावनिक मोलाचा उल्लेख वर केलाच आहे. परंतु काही वेळा येथे कौटुंबिक स्वरूपाची विशेष बंधने नसणारे किंवा ती जाचक असल्याकारणाने त्यापासून दूर जाऊ इच्छिणारे लोकही त्यात आढळतात. कुणाचे वडील कडक स्वभावाचे तर कुणाची आई सावत्र ! कुणाला भाऊबंदकी भोवते तर कुणाचे नातेवाईक गैरफायदा घेणारे ! ! यामुळे नको असलेल्या जबाबदारीपासूनही त्याना दूर जायला हवे असते ! काही वेळा वेळीअवेळी निर्भर्त्सना करणाऱ्या नातेवाईकांना " आपणही कर्तृत्ववान आहोत " याचा प्रत्यय आणून द्यायचा असतो. या समस्यांचे स्वरूप अनेकदा अत्यंत विचित्र, गुंतागुंतीचे व कठीण असते. त्यावर कसलाही उपाय सापडणे कठिण आहे. अमेरिका वा युरोपीय राष्ट्रे सामाजिक जीवनाच्या दृष्टीने भिन्न आहेत. स्त्री-पुरुष संबंधात आमच्या मानाने तेथे कितीतरी अधिक मोकळेपणा आहे. यामुळे तेथे जाणारी तरुण मंडळी अनेकवेळा प्रेमपाशात अडकतात; व परत येऊ इच्छित नाहीत. हा अनुभव ध्यानात घेऊन " लग्न करून जा "



अनुक्रमणिका







असा आग्रह धरण्याकडे पालकांचा अलीकडे अधिका-अधिक कल झुकू लागला आहे. परंतु अशा पाशात सापडणे वाटते तितके सुलभ नाही. कित्येक उदाहरणा-वरून " परत येण्याची इच्छा नसल्याने अशी बंधने निर्माण करण्याची प्रवृत्ति " म्हणजे अगदी उलटी परि-स्थिती देखील प्रत्ययास येते.

परदेशात जाऊन तेथेच कायमचे वास्तव्य करणे ही प्रवृत्ति केवळ शिक्षणासाठी जाणारापुरतीच मर्यादित नाही. शिक्षण व औद्योगिक वा व्यावसायिक अनुभव किंवा केवळ व्यावसायिक अनुभव यासाठी देखील बाहेर जाणारे काही आढळतात. त्यांची उदाहरणे बुद्धिमतांच्या अपनयनाच्या समस्येत सर्वस्वी बसू शकतीलच असे नाही. शिक्षण देशात पुरे करायचे व अनुभव घेण्यासाठी बाहेर जायचे या गटात मोडणाऱ्या व्यक्ती या बहुधा वयाने प्रौढ व येथील जीवनात काही विशिष्ट प्रकारचे कार्य करण्याची महत्वाकांक्षा बाळग-णाऱ्या असतात. त्यामुळे त्यांच्या बाबतीत बाहेरच कायमचे वास्तव्य करण्याचा संभव काहीसा कमी होतो. शिक्षण व व्यावसायिक अनुभव याची सांगड घालू इच्छिणारे वैद्यकीय व्यवसायातील लोक हे मात्र येथे एक महत्वाचा अपवाद होत.

बुद्धिमंतांच्या अपनयनाचा प्रश्न केवळ प्रथम श्रेणीच्या अत्यंत बुद्धिमान व होतकरू तरुणांपुरताच मर्यादित करणे कदाचित आजच्या परिस्थितीत अधिक योग्य ठरेल. या समस्येची ही बाजू अधिक धोक्याचीही आहे. येथील विद्यापीठांच्या व उच्च संशोधन संस्थांच्या योग्य विकासावरच तो उकलणे अवलंबून आहे. या विकासाचे स्वरूप व त्याबद्दलच्या जबाबदाऱ्या व पथ्ये हा स्वतंत्र विषय असल्याने येथेच तूर्त थांबणे योग्य ठरेल. प्रस्तुत लेखनाचा हेतु या प्रश्नाला तोंड फोडणे इतकाच आहे. यावर अधिक चर्चा होणे आवश्यक आहे असे वाटते.





अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

श्री. माधव देशपांडे

# ' संस्कृत काव्याची प्रयोजने व हेतु ' : २ :

## ' काव्याचे हेतु '

काव्याच्या प्रयोजनांचा विमर्श केल्यानंतर, काव्यशास्त्राच्या परंपरेला अनुसरून चर्चेचा दुसरा विषय येतो तो म्हणजे काव्याच्या हेतूंचा विचार. कारणाशिवाय कोणतेही कार्य असत नाही आणि जिथे कार्य असते तिथे कारण हे असलेच पाहिजे. या दृष्टीनेच काव्य हे एक कार्य आहे असे म्हटल्यावर त्या काव्याला कारणे असलीच पाहिजेत. अशा गोष्टी की ज्या असल्याशिवाय काव्याचा उद्‌गम होत नाही त्या गोष्टी म्हणजे काव्याचे हेतु. काव्य करण्यासाठी कवीजवळ आवश्यक असलेली सारी सामग्री म्हणजे काव्याची कारणे.

साहित्यशास्त्रात काव्यहेतूंची समीक्षा करताना तीन गोष्टींचा प्रामुख्याने विचार केला जातो. त्या तीन गोष्टी म्हणजे प्रतिभा म्हणजे शक्ति, निपुणता म्हणजे व्युत्पत्ति किंवा वैदग्ध्य, आणि अभ्यास म्हणजे सतत परिश्रम. या तीन गोष्टी समुच्चयाने काव्याच्या निर्मितीस कारणीभूत आहेत असे काव्यप्रकाशकाराने सांगितले आहे. या व्यतिरिक्त इतरही काही कारणे इतर काही आलंकारिकांनी सांगितली आहेत. या साऱ्या कारणांचे स्वरूप व त्यांचे परस्पर सापेक्ष महत्त्व याविषयी अनेक मतभेद संस्कृत साहित्यशास्त्रात दिसून येतात. त्यांचे अवलोकन करताना प्रथम कारणांच्या स्वरूपाचा विचार करून नंतर त्यांचे सापेक्ष महत्त्व विचारात घेणे उचित होईल.

## काव्यकारणांचा विचार

प्रतिभा, व्युत्पत्ति, अभ्यास, स्वास्थ्य, भक्ति, विद्वत्कथा, स्मरणशक्ति, प्रसन्नता, अवधान अशी जी अनेक कारणे सांगितली जातात त्यांचे वर्गीकरण करता येईल काय असा प्रश्न निर्माण होतो. हे वर्गीकरण करण्यासाठी काव्याच्या घटनेचा विचार करणे आवश्यक आहे. सामान्यतः शब्द, अर्थ, त्यांची विशिष्ट रचना, आणि रस हे काव्याचे घटक आहेत असे मानले तर महत्त्वाच्या क्रमानुसार शब्द व अर्थ हे गौण आहेत. विशिष्ट शब्दार्थरचनेचे महत्त्व त्यांच्यापेक्षा अधिक आहे व ध्वनि आणि रस यांना सर्वात महत्त्वाचें स्थान आहे. याच अनुरोधाने, साऱ्या कारणांचा प्रतिभा, व्युत्पत्ति व अभ्यास या तीनही कारणांत समावेश करून असे म्हणता येईल की प्रतिभा हे त्या ध्वनि आणि रसाचे कारण आहे. व्युत्पत्ति हे शब्द व अर्थ यांच्या उपगमाचे कारण आहे तर त्या शब्दार्थांच्या विशिष्ट रचनेमागे अभ्यास हे कारण आहे. काव्याच्या घटकांचा विचार करून, त्यांचे सापेक्ष महत्त्व ध्यानात घेऊन जर काव्याची ' रमणीयताभिव्यञ्जका शब्दार्थयोर्विशिष्टा रचना ' अशी व्याख्या केली तर त्या काव्याला प्रतिभा, व्युत्पत्ति आणि अभ्यास या तीन गोष्टी कशा कारणीभूत होतात हे सहज समजून येऊ शकेल.

## प्रतिभेचें स्वरूप व माहात्म्य

भावनात्मक तल्लीनतेची सूक्ष्म तरल अवस्था असे ज्या प्रतिभेचें वर्णन केले जाते त्या प्रतिभेच्या स्वरूपाचा विचार संस्कृत साहित्यशास्त्रात फार विस्तृत स्वरूपात व विविध दृष्टींनी झाला आहे. ' रहिता सत्कवित्वेन कीदृशी वाग्विदग्धता । काव्यं तु जायते जातु कस्यचित् प्रतिभावतः ' असे भामह त्या प्रतिभेचे महत्त्व वर्णन करतो. तर काव्यालंकारसूत्रात आचार्य वामनाने प्रतिभेला कवित्वाचे बीज म्हटले आहे. ' प्रतिभा कारणं तस्य '








असे म्हणून वाग्भटाने कवित्वासाठी प्रतिभेची आवश्यकता सांगितली आहे. प्रतिभा म्हणजे कवित्वाला बीजभूत असा एक संस्कारविशेष आहे की ज्याच्या अभावी काव्य निर्माणच होत नाही व जरी झाले तरी ते उपहासास्पद होते असे प्रकाशकाराने सांगितले आहे.

'वन्देम देवतां वाचममृतामात्मनः कलाम्' असे जिचे भवभूतीने वंदन केले ती प्रतिभा केवळ मानसिक शक्ति नव्हे. पूर्व-जन्मातील संस्कारामुळे प्राप्त होणाऱ्या या प्रतिभेत दैवी अंश आहे. 'कवित्वं दुर्लभं लोके शक्तिस्तत्र सुदुर्लभा' या आशयाप्रमाणे प्रतिभा ही दुर्लभ आहे व म्हणूनच तिच्यात अलौकिकत्वाची प्रतीति येते. या प्रतिभेमुळेच कवीच्या ठिकाणी 'लोकोत्तरवर्णनानिपुण्यत्व' येते. प्रतिभेला 'Force of divine breath' असे म्हणणारा ॲरिस्टॉटल व 'Poetry has something divine in it.' असे म्हणणारा मिल्टन् हे सारे प्रतिभेच्या दिव्यत्वाला मान देतात.

या प्रतिभेचे रुद्रटाने दोन भेद मानले आहेत : सहजा व उत्पाद्या. या दोन प्रकारांपैकी सहजा ही जन्मसिद्ध आहे तर उत्पाद्या ही शास्त्राभ्यास वगैरे जन्मोत्तर संस्कारांनी प्रादुर्भूत होते. स्वभावतः प्राप्त झाल्यामुळे यातील सहजा ही अधिक श्रेष्ठ आहे. राजशेखराने प्रतिभा ही सहजा, आहार्या आणि औपदेशिकी अशी त्रिविध मानून कवीदेखील तदनुसार तीन प्रकारचे मानले आहेत– सारस्वत, आभ्यासिक व औपदेशिक. जगन्नाथ प्रतिभेला सहेतुक मानतो. 'देवतामहापुरुषप्रसादादिजन्य अदृष्ट' हा प्रतिभेचा अदृष्ट हेतु आहे तर अभ्यास आणि वैदग्ध्य हे त्या प्रतिभेचे दृष्ट हेतु आहेत. त्याच्या मताने 'अभ्यास आणि वैदग्ध्य' हे प्रतिभेचे हेतु होत, संस्कारक नव्हेत.

मन स्वस्थ असताना जिच्यामध्ये काव्यविषय सारखा रेंगाळत असतो व तदनुकूल सुसंगत अशा शब्दार्थांचे स्फुरण होत असते ती मानसिक शक्ति म्हणजे प्रतिभा. वाग्भटाने 'स्फुरन्ती सत्कवेर्बुद्धिः प्रतिभा सर्वतोमुखी' असे प्रतिभेचे वर्णन केले आहे. 'लोकोत्तरवर्णनानिपुणलक्षण' अशा काव्याच्या उद्भवाला कारणीभूत (उपादानत्व) अशी एक 'वासनारूप' शक्ति असेही प्रतिभेचे स्वरूप सांगितले जाते.

"या शब्दग्राममर्थसार्थमलंकारतन्त्रमुक्तिमार्गमन्यदपि तथाविधम् अधिहृदयं प्रतिभासयति सा प्रतिभा" असे प्रतिभेविषयी म्हणणारा राजशेखर, प्रतिभा ही कवीची अंतर्दृष्टि आहे असे म्हणतो. 'साध्याही विषयात आशय कधी मोठा किती आढळे' अशा प्रकारची साध्या गोष्टीत विश्व पाहण्याची शक्ति कवीला प्रतिभेमुळे प्राप्त होते. दिशा व काल यांच्या पलीकडे जाऊन दिव्यत्वाची अनुभूति प्रतिभेशिवाय येऊ शकत नाही. व्यवहाराच्या बंधनांना तोडून चेतनाच्या ठिकाणी अचेतनत्व व अचेतनाच्या ठिकाणी चेतनत्व पाहाणे केवळ त्या 'पश्यन्त्याख्या' प्रतिभेमुळेच शक्य आहे. याच अभिप्रायाने काव्यमीमांसाकार म्हणतो– 'अप्रतिभस्य पदार्थसार्थः परोक्ष इव, प्रतिभावतः पुनरपश्यतोऽपि प्रत्यक्ष इव।' राजशेखराची बुद्धि याही पलीकडे जाते. त्याने प्रतिभेचे 'कारयित्री व भावयित्री' असे दोन भेद केले आहेत. त्याच्या मताने प्रतिभा ही केवळ कवीलाच नव्हे तर रसिकालाही उपपन्न असली पाहिजे. कारयित्री ही कविगत प्रतिभा तर भावयित्री ही रसिकाच्या ठिकाणची 'सुसंस्कृत' रसिकता.

"सा हि चक्षुर्भगवतः तृतीयमिति गीयते ।
येन साक्षात्करोत्येष भावान् त्रैकाल्यवर्तिनः ।।"

विचारांच्या वावटळीत गुरफटलेल्या कवीला स्फूर्ति देणारा प्रकाश म्हणजे प्रतिभा. या प्रतिभेला कविरूपी परमेश्वराचे तृतीय नेत्र अशी उपमा भामहाने दिली आहे. प्रत्येक कवीच्या ठिकाणी ऋषित्व हे असतेच असे हेमचंद्राने म्हटले आहे.

ऋषि शब्दाची व्युत्पत्ति ज्याप्रमाणे ' दर्शनात् ऋषिः ' अशी सांगितली जाते त्याप्रमाणेच ' दर्शनात् कविः ' असे तो म्हणतो. अलौकिक अशा प्रतिभेच्या बळावर प्राप्त होणारे हे दर्शन म्हणजे काय याविषयी त्याने सांगितले आहे– ' विचित्रभावधर्मांश-तत्वप्रख्या च दर्शनम् । '

अभिनवगुप्ताने या प्रतिभेला एक उदात्त स्वरूप दिले आहे. त्याला ब्रह्मतत्त्वाचे अलौकिक गुण-देखील प्रतिभेत दिसतात. प्रतिभादेवतेला वंदन करताना त्याने ' परा, अनुत्तरा व निजभासा ' अशी अर्थगर्भ विशेषणे वापरली आहेत. अपूर्ववस्तु-निर्माणक्षम अशी प्रज्ञा म्हणजे प्रतिभा. त्या प्रतिभेचे वैशिष्ट्य तो सांगतो– 'तस्याः विशेषो रसावेशवैशद्य-सौंदर्यकाव्यनिर्माणक्षमत्वम् । ' प्रकाशकाराने दिलेल्या ' लोकोत्तर... ' या काव्याच्या विशेषणातूनही प्रति-भेचे अलौकिकवस्तुजनकत्व दिसून येते. जीवनाच्या निरीक्षणातून कवि स्वतःचे असे स्वतंत्र विश्व निर्माण करतो. या नावीन्यनिर्मिति करू शकणाऱ्या प्रति-भेस संस्कृत साहित्यिक ' नवनवोन्मेषशालिनी ' असे म्हणतात. ' रमणीय अर्थाचे प्रतिपादन करणारा शब्द ' अशा प्रतिभावंतांच्या काव्याच्या रमणीय-तेचे बीज या 'नवतेतच' दडलेले असावे. म्हटलेच आहे–

"क्षणे क्षणे यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः । "

काव्यप्रकाशकार प्रतिभेच्या स्वरूपात अधिक खोल शिरत नाही. कवित्वाला बीजभूत असासं स्कार-विशेष असे प्रतिभेचे स्वरूप सांगून प्रतिभेवाचून काव्यनिर्माण होणार नाही व झाले तरी उपहासास पात्र ठरेल असे तो म्हणतो. परंतु त्याचे प्रतिभा-विषयक विचार प्रथम त्याच्या मंगल श्लोकातच दिसून येतात.

नियतिकृतनियमरहितां ह्लादैकमयीमनन्यपरतन्त्राम् ।
नवरसरुचिरां निर्मितिमादधती भारती कवेर्जयति ॥
( काव्यप्रकाश )

## वैदग्ध्य : दुसरे काव्यकारण

काव्याचे दुसरे ' कारण ' म्हणजे वैदग्ध्य. ' उचितानुचितविवेक ' अशा या वैदग्ध्याला दण्डी श्रुत असे म्हणतो तर मम्मटाने त्यास निपुणता असे म्हटले आहे. या बहुज्ञतेचे स्वरूप सांगताना अभि-नवगुप्त याने लिहिले आहे– ' व्युत्पत्तिः काव्योप-योगिसमस्तवस्तुपौर्वापर्यपरामर्शकौशलम् । ' चर व अचर अशा लोकस्थितीचे सम्यक् ज्ञान, छन्दःशास्त्र, व्याकरण, शब्दकोश, कला, चतुर्विध पुरुषार्थासम्ब-धीची शास्त्रे, युद्धविषयक शास्त्रांचा अभ्यास, प्रथित-यश कवींच्या कृतींचे अध्ययन या सर्वांमुळे निर्माण झालेले वैदग्ध्य काव्याचे कारण आहे. इतर साऱ्या शास्त्रकारांनी कमी अधिक लांबीची तीच यादी सागि-तली आहे. ' सुपां तिङां च श्रवः सैषा व्युत्पत्तिः ' या राजशेखराच्या व्युत्पत्तीच्या कल्पनेपासून उपर्युक्त विस्तृत कल्पनेपर्यन्त वैदग्ध्याचा विस्तार आहे. परंतु यच्चयावत् जगताचे चित्र चित्रित करू पाहणाऱ्या कवीला साऱ्या जगताचे ज्ञान असणे अनिवार्य आहे. काव्य हे साऱ्या ज्ञानवर्तुलाचा परीघ आहे व केन्द्रही आहे.

" न स शब्दो न तद्वाच्यं न स न्यायो न सा कला ।
जायते यन्न काव्याङ्गमहो भारो महान् कवेः ॥ "

" एकः शब्दः ... ... ' हे महाभाष्यातील वचन सांगते की एखादा शब्द जरी नीट जाणून योग्य ठिकाणी प्रयुक्त केला तरी तो स्वर्गप्रद ठरतो. स्वर्गाचा विचार जरी दूर राहिला तरी ' पदनिवेश-निष्कम्पता ' अशा पदस्थैर्याला काव्यात महत्त्व आहे. या ' काव्यपाका ' साठी योग्य शब्दांचा योग्य ठिकाणी प्रयोग करण्यासाठी केवळ प्रतिभा पुरी पडणार नाही. त्यासाठी वैदग्ध्याची आवश्यकता आहे. वाणीच्या अर्थज्ञापनाच्या सामर्थ्याविषयी दण्डीने काढलेले उद्गार फार मार्मिक आहेत.











" गौणाः कामदुघा सम्यक् प्रयुक्ता स्मर्यते बुधैः ।
दुष्प्रयुक्ता पुनर्गोत्वं प्रयोक्तुः सैव शंसति ॥ "

काव्यरचनेत उचित आणि अनुचित यातील तारतम्य करण्याची शक्ति केवळ विद्वत्तेच्या जोरावरच कवीच्या ठिकाणी येऊ शकते. कवीचा एक शब्द जरी बदलला तरी त्या काव्याचे सौन्दर्य नष्ट होते. याच अभिप्रायाने डॉ. जॉन्सन यांनी मिल्टनच्या काव्याविषयी म्हटले आहे.– ' Poetry acts like an incantation. ' एखादा सामान्य शब्दही प्रतिभावान् कवीच्या काव्यात मोठा अर्थ धारण करतो तर नाबालाच कवि असलेल्यांच्या काव्यात चांगलाही शब्द अस्थानी दिसतो. म्हणूनच शब्दांच्या गुंफणीला भामहाने मालेत पुष्पे गुंफण्याची दिलेली उपमा समर्पक दिसते. या तारतम्याच्या शक्तीसाठी कवीचे ज्ञान विस्तृत व निश्चित हवे. याविषयी एका आंग्ल टीकाकाराने म्हटले आहे–

" A poet is required to have an exactness of study and multiplicity of reading which makes a full man. "

## अभ्यासाचे काव्यकारणातील महत्त्व

केवळ विद्वत्ता आणि प्रतिभा यामुळे उत्कृष्ट काव्य निर्माण होऊ शकणार नाही तर त्यासाठी अविरत प्रयत्नांचीही आवश्यकता आहे. ज्यांना काव्याचे मूल्यमापन करता येते व काव्यही करता येते अशा लोकांच्या मार्गदर्शनाने काव्यरचनेचा पुनः पुनः प्रयत्न म्हणजे अभ्यास. एका साहित्यिकाने म्हटले आहे–– ' अविच्छेदेन शीलनमभ्यासः । स हि सर्वगामी निरतिशयं कौशलमाधत्ते । ' ' योग ' या शब्दाचा जर थोडा निराळा अर्थ घेतला तर ' योगः कर्मसु कौशलम् ' यातूनही अभ्यासाचेच महत्त्व सांगितलेले दिसून येईल. या अभ्यासाचे महत्त्व हेमचन्द्र एका सुंदर दाखल्याच्या द्वारा आपल्या नजरेस आणतो –

' अभ्यासो हि कर्मसु कौशलमावहति । नहि सकृन्निपतितमात्रेण उदबिन्दुरपि ग्रावणि निम्नतामादधाति । "

काव्याची इतरही काही प्रयोजने सांगितली गेली आहेत. स्वास्थ्य, प्रतिभा, अभ्यास, भक्ति, विद्वत्कथा, बहुश्रुतपणा, तीव्र स्मरणशक्ति व मनाची प्रसन्नता या आठ गोष्टींना राजशेखराने काव्याच्या माता म्हणून संबोधले आहे. परंतु प्रतिभा, बहुश्रुतता व अभ्यास या व्यतिरिक्त इतर कारणांचे गौणत्व नाकारता येणार नाही. किंबहुना या साऱ्या कारणांचा थोड्या फार फरकाने कारणत्रयात समावेश करता येतो. आचार्य वामनाने अवधान किंवा मनाची एकाग्रता हे एक कारण सांगितले आहे. काल व देश यांच्यावर अवलंबून असणारे हे अवधान निर्जन प्रदेश व रात्रीचा सरता प्रहर यामुळे निर्माण होते. या कालनिर्देशाविषयी कालिदासानेही म्हटले आहे–

' पश्चिमात् यामिनीयामात् प्रसादमिव चेतना । '
( रघुवंशम् )

## पंडितांची मते

प्रकाशकाराने प्रतिभा किंवा शक्ति या कारणाचा प्रथम उल्लेख केला आहे व प्रतिभेचे ते सर्वाधिक महत्त्व त्याच्या विवेचनावरून स्पष्ट होते. प्रतिभा, व्युत्पत्ति व अभ्यास या तिघांचा समुच्चय काव्याला कारणीभूत होतो एवढेच जर त्याने म्हटले असते तर काही संशय निर्माण झाला नसता. परंतु ' निर्माणे समुल्लासे च ' या त्याने वापरलेल्या शब्दांवरून प्रतिभा हे काव्यनिर्मितीचे कारण आहे तर व्युत्पत्ति व अभ्यास ही काव्य समुल्लासाची कारणे होत असा त्याचा अभिप्राय दिसून येतो.

" काव्यं तु जायते जातु कस्यचित् प्रतिभावतः " असे सांगणारा भामह आणि " तस्य च कारणं केवला कविगता प्रतिभा " असे म्हणणारे राजशेखर व जगन्नाथ प्रतिभा हाच काव्याचा एकमेव हेतु

असे मानतात. प्रतिभा हेच काव्याचे कारण आहे व व्युत्पत्ति आणि अभ्यास हे तिचे संस्कारक आहेत. राजशेखराने उल्लेख केलेला आचार्य आनंद याच्या मताने प्रतिभा आणि व्युत्पत्ति यामध्ये प्रतिभाच श्रेष्ठ आहे. विद्वत्तेच्या कमतरतेमुळे झालेले दोष प्रतिभेमुळे भरून निघतात असे त्याने म्हटले आहे–

" अव्युत्पत्तिकृतो दोषः शक्त्या संव्रियते कवेः ।
यस्त्वशक्तिकृतस्तस्य स झगित्यवभासते ॥ "

याउलट व्युत्पत्ति हीच प्रतिभेपेक्षा श्रेष्ठ आहे असे म्हणणारा राजशेखराने सांगितलेला आचार्य मंगल वगैरेही उदाहरणे क्वचित् दिसून येतात. 'त्रितयमिदं व्याप्रियते शक्तिर्व्युत्पत्तिरभ्यासः' या पंथाच्या मम्मट, रुद्रट वगैरेंच्या मताप्रमाणे प्रतिभा व्युत्पत्ति व अभ्यास यांचा समुच्चयच काव्याचे कारण आहे. 'हेतुः न तु हेतवः' या उद्गारात हाच अभिप्राय आहे, याच पंथाचा पुरस्कर्ता काव्यादर्शकार म्हणतो–

" नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहु निर्मलम् ।
अमन्दश्चाभियोगेऽस्याः कारणं काव्यसम्पदः ॥ "

### तीन कारणांचा समवाय अपरिहार्य

या विचारप्रवाहात जरी विरोध दिसत असला तरी अन्ततो गत्वा तो विरोध वरवरचा आहे. मम्मटाच्या मताप्रमाणेही काव्याचे कारण प्रतिभा हेच आहे. परंतु काव्याचा उद्भव म्हणून त्याला केवळ काव्यनिर्माण किंवा काव्यसमुल्लास मान्य नाही तर या दोनही गोष्टी त्याला एकदम हव्या आहेत. त्याच्या काव्यशब्दाचा अर्थ केवळ काव्य असा नाही तर उत्कृष्ट काव्य असा आहे. आणि या अर्थाने त्याला तिन्ही कारणांचा समवाय हाच कारण म्हणून अभिप्रेत आहे. काव्यात रस आणि ध्वनि यांना प्राधान्याने महत्त्व असल्यामुळे त्यांची जन्मदात्री जी प्रतिभा तिचे महत्त्व अनन्य साधारण खरेच. पण रस आणि ध्वनि यांची अभिव्यक्ति ही मात्र शब्दार्थांच्या विशिष्ट रचनेशिवाय होत नाही. म्हणून शब्दार्थ व ती विशिष्ट रचना यांची कारणे असलेल्या व्युत्पत्ति आणि अभ्यास यांनाही महत्त्व आहे. उपर्युक्त साऱ्या घटकांनी युक्त असल्याशिवाय जर उत्तम काव्य निर्माण होत नाही तर त्या घटकांची जी कारणे त्यांच्या अभावात निर्माण होणारच नाही. यामुळे प्रत्येक कारणाचे सापेक्ष महत्त्व निराळे असले तरी साऱ्यांच्या समुच्चयाखेरीज कार्याची प्रवृत्ति होत नाही. हा समुचित हेतु जर काव्याला नसेल तर असंपूर्ण असे ते काव्य उपहासास पात्र होईल हा अर्थ मम्मटाला अभिप्रेत आहे. जगन्नाथाच्या प्रतिभेचा निर्मिति हेतु म्हणजे 'व्युत्पत्ति व अभ्यास' आहेत. तर प्रतिभा हेच काव्याचे कारण असे म्हणणारा राजशेखरही शेवटी प्रतिभा व व्युत्पत्ति दोनही असणे श्रेयस्कर असे म्हणतो. 'प्रतिभाव्युत्पत्तिमांश्च कविः कविरित्युच्यते' असे म्हणणाऱ्या राजशेखरानेच खरोखर प्रतिभा व व्युत्पत्ति यांचा सुंदर संगम साधला आहे. तो म्हणतो– प्रतिभाव्युत्पत्ती मिथः समवेते श्रेयस्यौ । न खलु लावण्यलाभादृते रूपसंपद् ऋते रूपसंपदो वा लावण्यलब्धिः महते सौन्दर्याय । " ( काव्यमीमांसा )

या दृष्टिकोनास किंचिद् अपवादभूत असा जर कोणी असेल तर तो दण्डी. जन्मजात प्रतिभा नसली तरी व्युत्पत्ति व दृढ परिश्रम यांच्यामुळे एखाद्याला कवि होणे अगदीच अशक्य नाही. 'परिश्रमस्थं जनमन्तरेण मौनिव्रतं बिभ्रति वाग्मिनोऽपि' या भूमिकेतून पाहणारा दंडी म्हणतो--

" न विद्यते यद्यपि पूर्ववासना–
गुणानुबन्धि प्रतिभानमद्भुतम्,
श्रुतेन यत्नेन च वागुपासिता
ध्रुवं करोत्येव कमप्यनुग्रहम् ।
( काव्यादर्श )

काही अपवाद वगळता संस्कृत साहित्यशास्त्रात समान विचारधारा दिसून येते. केवळ काव्यनिर्मितीच्या बाबतीत प्रतिभा हेच काव्यकारण आहे,









अनुक्रमणिका

रसवत्व किंवा ध्वनिमत्व हा जरी व्यवच्छेदक धर्म मानला तरी केवळ व्यवच्छेदक धर्माच्या निर्मितीने संपूर्ण काव्य निर्माण होणार नाही. किंबहुना शब्द व अर्थ यांच्या विशिष्ट रचनेशिवाय रसाचे अस्तित्वच असू शकत नाही. म्हणून उपहसनीय नसणाऱ्या अशा उत्कृष्ट काव्याचा हेतु म्हणून तीन हेतूंचा समुच्चयच स्वीकार्य आहे. ही सारी ' सामग्री ' नसेल तर वाईट कवि होण्यापेक्षा कवि न होणेच बरे. म्हटलेच आहे. – " वरमकविः न पुनः कुकविः । कुकविता हि सोच्छ्वासं मरणम् । " अशा या विस्तृत हेतुसमीक्षेचा सारा अभिप्राय ' श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रन्थकोटिभिः ' या न्यायाने एका श्लोकातही सांगता येईल –

" कवित्वं जायते शक्तेः वर्धतेऽभ्यासयोगतः ।
अस्य चारुत्वनिष्पत्तौ व्युत्पत्तिस्तु गरीयसी ॥ "

---














प्रा. स. रा. गाडगीळ

# प्राचीन भारतातील भौतिकवाद[१] : ५ :

## ( गणजीवी वैदिक आर्यांचा अन्नब्रह्मवाद )

"समान ऊर्वे अधि संगतासः सं जानते न यतन्ते मिथस्ते।
ते देवानां न मिनन्ति व्रता न्यमर्धन्तो वसुभिर्यादमानाः ॥"

( ऋ. ७. ७६. ५ )

"समानी प्रपासहवोऽन्नभागः समाने योक्त्रे सहवो युनज्मि।
सम्यञ्चोऽग्निं सपर्यतारा नाभिमिवाभितः ॥

( अथर्व. ३·३०·६ )

तंत्रोपासना ही मूलतः आर्यपूर्व भारतातील कृषिप्रधान मातृसत्ताक समाजाची यातुसाधना ( magical rite ) असावी हे यापूर्वी आपण पाहिले. आर्यपूर्वांच्या या प्राथमिक इहलोकवादातूनच सांख्यांच्या प्रकृति-पुरुषवादाचा विकास झाला. भारतीय जडवादी परंपरेतील हा आर्यपूर्व आणि वेदबाह्य प्रवाह उत्तर कालात वेदान्त तत्त्वज्ञानात विलीन झाला हे खरे; परंतु वैदिक आर्यही प्रारंभी इहलोकवादीच होते – अगदी अन्नब्रह्मवादी होते. ब्रह्म, आत्मा, मोक्ष या कल्पना वैदिक वाङ्मयाच्या उत्तरकालीन अवस्थेत उदयाला आल्या आणि उपनिषद्कालात त्यांचा पूर्ण विकास झाला. हे वैचारिक परिवर्तन वैदिक आर्यांच्या सामाजिक-आर्थिक परिवर्तनाशी केवळ समांतर आहे असे नसून त्यांच्यामध्ये आंतरिक संबंध असल्याचे दिसून येते. संहिताकालापासून उपनिषद्कालापर्यंत वैदिक आर्यांच्या जीवनात फार मोठाले बदल घडून आले. गोपालन अवस्थेतील सामूहिक जीवनाचा अस्त होऊन वर्ग-वर्णयुक्त समाज उदयाला आला. आर्यांच्या दैवतशास्त्रात ( mythology ) वरुणयुगाचा शेवट होऊन इंद्रयुगाचा प्रारंभ झाला; मूळचा इहलोकपर सामूहिक यज्ञविधि लुप्त होऊन ब्राह्मणकालातील क्षत्रिय-ब्राह्मणप्रधान स्वर्गकामेष्टी यज्ञ उदयाला आला. 'ऋत'सिद्धांताची जागा 'कर्म'सिद्धांताने घेतली; आणि शेवटी इहलोकपर कर्मांची आणि ही कर्मे करणाऱ्या सर्वसामान्य समाजाची अवहेलना सुरू होऊन शुद्ध ज्ञानप्रधान आत्मवादाचा उदय झाला. या सर्व घटनांचे आणि त्यामागील आर्थिक-सामाजिक प्रक्रियांचे अवलोकन या व पुढील लेखात करण्याचे योजिले आहे.

### गोपालन अवस्था ( Pastoral economy )

वैदिक आर्य भारतात आले त्यावेळी ते गोपालन अवस्थेत होते. गाय आणि बैल हेच त्यांचे सर्वस्व. जीवनातील सर्व व्यवहार 'गाय' याच धनाच्या परिभाषेत होत. गो = गाय, पृथ्वी; इळा = पृथ्वी, गो, वाक्, अन्न. अदिति या शब्दाचे समानार्थक शब्द गो, पृथ्वी हेच आहेत. वैदिक देव 'गोजाताः'[२अ] या शब्दाने उल्लेखिले जात. पृथ्वी आणि स्वर्ग यांमधील अंतर एक सहस्र गायी एकमेकींवर उभ्या करून मोजता येईल असे पंचविंश ब्राह्मणात सुचविले आहे. प्रतिस्पर्धी टोळीच्या गोधनाचे अपहरण करणे अगर तशी इच्छा करणे या अर्थाचा 'गविष्टि' हा शब्द युद्धवाचक आहे. टोळयाटोळयांमधील युद्धाचे कारण 'गोधन' हेच असे. गम = जाणे या धातूच्या मागे 'गोषु' (गोसमूहात) हा शब्द जोडल्याने 'युद्धावर निघणे' असा अर्थ निष्पन्न होतो. 'गोत्र' हा शब्दही मुळात 'गोठा' ( गोष्ठ = Cowstall ) याच अर्थाचा होता. तत्कालीन आर्य आपले कुल (गोत्र) टोळीच्या गोसमूहावरून ओळखीत असावेत. 'गो' शब्दाचे हे सर्वंगामित्व वैदिक आर्यांच्या गोपालन अवस्थेचे निदर्शक आहे. आजही

१. या पूर्वीचे लेखांत: 'नवभारत' जाने. फेब्रु. मार्च, मे १९६४
२. नवभारत : फेब्रु. १९६४
२ अ. ऋग्वेद ६·५०·११

जीवनाच्या याच पायरीवर असणाऱ्या डिंका, तोडा, काफीर या लोकांच्या अनेक कल्पना वैदिक आर्यांच्या कल्पनांशी पूर्णपणे जुळणाऱ्या आहेत. पशुधनाचे अपहरण हेच डिंका टोळयांच्या युद्धाचे कारण होय. या जमातीतही 'गोत्र' वाचक शब्द आणि 'गोष्ठ' वाचक शब्द एकच आहे. या टोळयातील 'ut' 'gol' 'deb' हे गोत्रवाचक (कुल-clan) शब्दच 'गोष्ठ' (cow-stall) या अर्थानेही रूढ आहेत. आर्यांच्या इंद्र या युद्धदेवतेचा उदय होण्यापूर्वी वरुण हा त्यांचा प्रमुख देव होता. डिंका जमातीचा 'डेंगडिट' हा वरुणाप्रमाणेच 'जलदेव' (Great Rain) आहे. स्वर्ग आणि पृथ्वी एकमेकांपासून विलग ठेवण्याचे कार्य वरुणाप्रमाणेच डेंगडिटही करतो. ही कल्पना तर सर्वच प्राथमिक समाजात आढळते.

## आर्यांचे देव

प्राचीन आर्यांच्या 'देव' विषयक कल्पना आणि तोडा, डिंका यांच्या कल्पना यामध्ये विलक्षण साम्य आहे. तोडा लोकांचे 'देव' नीलगिरी पर्वतावर लोकसमूहातच राहात; यांच्या श्रमकार्यामध्ये ते सहभागी होत. डिंकांचे 'देव' डिंका जमातीत मानवरूपाने राहूनच त्यांचे मार्गदर्शन करीत. त्यांच्या 'प्रार्थना' म्हणजे भौतिक गरजांच्या परिपूर्तीसाठी केलेले उत्कट आवाहनच होय : "May there be no disease;" "With the buffaloes and Calves may it be well" "May be kept from floods;" "May rain fall", "May grass flourish,"[३] या प्रकारच्या 'प्रार्थनांचे वैदिक भाषेत भाषांतर केल्यास त्या वैदिक ऋचांमध्ये सहज सामावून जातील. आजच्या अर्थाचे 'देव' आणि 'प्रार्थना' यांचा अद्यापि उदय झालेला नव्हता.

वैदिक आर्यांचे देवही प्रारंभी मानवसमूहातच राहात होते; ते मानवच होते. इंद्र, अग्नि, मरुत्, ऋभु या देवांना अनेक ऋचांतून 'मानव' 'मानवोत्तम' या नावांनी ऋषींनी आवाहन केले आहे. अग्नी सभेमध्ये येऊन बसे (नृवत् सखा, सभावान्) कण्व, अत्री मनु हे प्राचीन ऋषि देवांच्या सान्निध्यातच राहात होते. अन्ननिर्मितीच्या कार्यामध्ये देव माणसांशी सहभागी होत. मित्रा-वरुणांना मानवसमूहात येऊन सोमप्राशन करण्याची विनंती केली जाते;[४] प्राचीन काळी इंद्र मानवामध्ये श्रेष्ठ होता. (पुराचित् सुरः नृणाम्) आपल्या शत्रूंच्या विनाशाचे कार्य इंद्राने अन्य मानवांच्या साहाय्यानेच पार पाडिले. इंद्र मानवाबरोबरच आपला धनाचा वाटा घेतो. इंद्राला साहाय्य करणारे अन्य मानवसमूह म्हणजे मरुद्गण असले पाहिजेत. सायणांनी या घटनेचा खुलासा पुढीलप्रमाणे केला आहे : "नृभिः मनुष्यैः एव सद्भिः पश्चात् देवत्वम् आपन्नैः मरुद्भिः" प्रारंभी मानव असलेले मरुद्गण नंतर देवत्व पावले हे यावरून स्पष्ट दिसते. मरुद्गणांच्या सामूहिक[४अ] जीवनाचे अनेक अवशेष वैदिक ऋषींच्या स्मृतीत रेंगाळत राहिलेले दिसतात. या गणांतील मानव एकत्र राहात, एकत्र श्रम करीत, एकत्र भोजन करीत; समूहगीते गात ते एकत्र काम करीत.[५] सामूहिकता आणि समता हे गणजीवी समाजाचे विशेष त्यांच्यामध्ये अद्यापीही आढळून येतात. त्यांना 'भूमिपुत्र' (पृष्णी मातरः) हे बिरुद लावलेले आढळते. रिभु हेही प्रारंभी मानवच होते; नंतर त्यांना देवत्व प्राप्त झाले असे ऋषि स्पष्ट म्हणतो. देवत्वप्राप्तीनंतरही रिभु सामूहिक जीवन जगतांना आढळतात.[७अ] अश्विनींच्याबद्दल[७आ] हीच माहिती मिळते. मानवाबरोबर त्यांचे बंधुत्वाचे आणि समानतेचे संबंध देवत्वप्राप्ती-

---

३. रायव्हर्सच्या भाषांतरावरून (The Todas)

४. ऋ. १·१३७·३

४ अ. ऋ. १·१४·३, १·३८·१५, १·६४·९, १·६४·१२, ३·३५·९, ५·५२·१३ इ.

५. ऋ. ५·५६·५, ७·५८·१, ५·५३·१, १·१६५·१, ७·५६·१ इ.

६. ऋ. १·८५·२

७. ऋ. १·११०·४, १·२०·१ (मर्तासः सन्तो अमृतत्वमानशुः)

७ अ. ऋ. १·१११·२

७ आ. ऋ. ७·७२·२, ३·५४·१७



अनुक्रमणिका






नंतरही राहिले होते. अग्नीसंबंधींची पुढील ऋचा अत्यंत महत्त्वाची आहे : " गोमाँ अग्नेऽविमाँ अश्वी यज्ञो । नृवत्सखा सदमिदप्रमृष्यः । इळावाँ एषो असुर प्रजावान् दीर्घो रयिः पृथुबुध्नः सभावान् ।।" (४·२·५) अविमान् ( = मेंढी ) शब्दाचा ऋग्वेदातील हा एकमेव आढळ होय. ही ऋचा अतिप्राचीन इंडो-इराण-काळातील-असावी. असुर हा शब्द अद्यापि पवित्र मानला जात होता. ( हे वरुणाचे विरुद्ध आहे. ) अग्नी मानवांच्या सभेमध्ये येऊन बसतो हा उल्लेख महत्त्वाचा आहे. ऋ. १·७५·४ मध्ये अग्नीला ' जमिः जनानाम् ' या नावाने संबोधिले आहे. (जमिः = मित्र, सखा ) यावरील सायणांचे भाष्य उद्बोधक आहे. ' जमु अदने ', जमन्तिसह एकस्मिन् पात्रे अदन्ति इति जमयः बांधवाः ( जम् = खाणे ) अग्नीचा हा उल्लेख अर्थपूर्ण आहे. अंगीरस आणि विश्वेदेव हे देवत्व प्राप्त करून घेणारे शेवटचे मानव होत. अंगीरस हे इंडो-इराण काळातील आर्यांचे पुरोहित होते. ऋषि त्यांचा अनेक ऋचातून आपले ' पूर्वज ' असा उल्लेख करतात. आथर्वण आणि भृगु यांच्यासह त्यांचा पूर्वज असा उल्लेख येतो.[८] ऋग्वेदाचे ९ वे मंडल अंगीरसानी रचिल्याचे अनुक्रमणिका सांगते. अंगीरसांच्या साहाय्याने इंद्राने 'वल'नाश[९] करून गायींची मुक्तता केली. पुढे इंद्रालाच अंगीरस ही संज्ञा प्राप्त झाली.[१०] नंतरच्या काही ऋचातून इंद्राची जागा अंगीरसांनीच घेतलेली दिसते;[११] कारण या वेळपर्यंत त्यांचे मनुष्यत्व जाऊन त्यांना देवत्व प्राप्त झाले होते. ऋ. १·३१·१७ मधील अंगीरस शब्दाचा द्विविध उपयोग लक्ष्य आहे. " मनुष्वदग्ने अङ्गिरस्वदङ्गिरो ययातिवत् सदने पूर्ववच्छुचे " ( O Agni, come to us as to Manus, as to Angiras, O *Angiras* ! )

समाजाच्या प्राथमिक अवस्थेत आजच्या अर्थाची ' देव ' कल्पना अद्यापि उदयाला आलेली नसते. देव हे त्या त्या मानवसमूहातच राहणारे त्यांचे सांस्कृतिक नेते असत उत्तरकाळात त्यांना देवत्व प्राप्त होई. सर्व शक्तिमान ईश्वर–विश्वाचा निर्माता–नियंता अद्यापि प्राथमिक मानवाच्या मनःसृष्टीत उदयाला आलेला नसल्याने त्याला प्रसन्न करण्यासाठी प्रार्थना करण्याची कल्पना अज्ञातच होती. सामूहिक मंत्रपठणामध्येच कामनापूर्तीची यात्वात्मक शक्ति ( Magical potency ) आहे अशी प्राथमिक मानवाची श्रद्धा असते. विशिष्ट मंत्रतंत्रात्मक कर्मकांडांच्या साहाय्याने निसर्गावर सत्ता प्रस्थापित करून शत्रूचा विनाश, टोळीचे संरक्षण, पर्जन्यवृष्टि, भूमीचे आणि स्त्रीचे सुफलीकरण या गोष्टी साध्य करून घेण्याचा त्याचा प्रयत्न असतो. " The Savage is a man of action. Instead of asking a God to do what he wants to be done, he does it or tries to do it himself; instead of prayers he utters spells. In a word he practices magic[१२] ...... ' धर्म ' कल्पना उदयाला येण्यापूर्वीची ही अवस्था आहे. **सामूहिकता** आणि **भावनात्मक आवेग** यांना मंत्रपठनामध्ये अत्यंत महत्त्व आहे. यामुळेच शब्दांना मंत्रांचे सामर्थ्य लाभते आणि साध्या कर्मांना ' विधीं 'चे महत्त्व प्राप्त होते.

वैदिक आर्य जरी या अवस्थेतून पुढे गेले होते तरी त्याना त्यांच्या पूर्वजाच्या मंत्रतंत्रात्मक कर्मकांडांचे सामर्थ्य परिचित असले पाहिजे. प्रारंभीच्या वैदिक ऋचातून याचे अवशेष विपुल प्रमाणात आढळतात; अगदी उपनिषद्काळापर्यंत त्याचे पडसाद ऐकू येतात. यज्ञकर्म हे यापैकीच एक यात्वात्मक कर्मकांड आहे. यज्ञविधीचा विचार नंतर स्वतंत्रच करू. सध्या यज्ञप्रसंगी ' विनियोगात ' आणावयाच्या वैदिक मंत्राचा थोडक्यात विचार करू.

' शुद्ध काव्य ' अथवा ' प्रार्थना ' या स्वरूपात वैदिक मंत्र अवतरलेले नाहीत. विशिष्ट विधि यथासांग

८. ऋ. १०·१४·६

९. ऋ. २·११·२०

१०. ऋ. १·१००·४

११. ऋ. १०·६२·२–३

१२. Harrisar : Ancient Art of Ritual












पार पाडण्यासाठी उच्चारलेले ते 'मंत्र' आहेत. सामवेदामध्ये आणि त्याचेच परिशिष्ट [13] म्हणून अवतरलेल्या छांदोग्यउपनिषदामध्ये या 'मंत्रपठणा'चा विस्तृत विचार केलेला आढळतो. सामवेदाच्या मंत्रपठणाला 'उद्गीथ' ही संज्ञा आहे. उद् + गी + थ या तीन वर्णांनी हा शब्द बनला आहे. यामध्ये अन्न संपादनाचा स्पष्ट उल्लेख आहे. उद् = प्राण; गी=वाणी, था = अन्न ( छां. १·३·६ ).

[ Tha is food, for upon food this whole world is established ] अन्नप्रातीसाठी अगर कामनापूर्तीसाठी केलेला मंत्रांचा सामूहिक उद्घोष म्हणजे 'उद्गीथ' ऋग्वेदातील मंत्रांना 'कामवर्षी' ही संज्ञा दिलेली आहे ती यथार्थ आहे. छांदोग्यामध्ये 'उद्गीथ' शब्दाचे जे माहात्म्य सांगितले आहे त्याचे रहस्य ऋचांच्या मंत्रसामर्थ्यांत आहे :

"The essence of person is Speech;
The essence of speech is the Rik;
The essence of the Rik is the Saman;
The essence of Saman is the Udgitha [14].
( छां. उ. १·१·२ )

जीवनाच्या अस्तित्वाचे सर्व रहस्य ऋचांच्या ताल--लय-बद्ध उद्घोषात आहे. हे सामगायन कामनापूर्तीसाठी विशिष्ट विधीबरोबर करावयाचे असते. ऋचांच्या उच्चाराला यात्वात्मक महत्त्व असल्याने त्यांचा उच्चार विशिष्ट पद्धतीनेच व्हावा लागतो. येथे 'वेडेवाकुडे गाईन परि तुझाचि म्हणवीन' या भक्तियोगाला स्थान नाही. मंत्रोच्चारामध्ये किंचित् दोष निर्माण होताच त्वष्ट्रीने स्वतःची हत्या करून घेतली याचे रहस्य त्या मंत्रोच्चारांच्या यात्वात्मक सामर्थ्यात सापडू शकेल. वैदिकमंत्र विशिष्ट आघातांनी युक्त अशा स्वरातच म्हणावयाचे असतात. हे आघात हाताने आणि मानेने दाखविले जातात. या स्वराघातामध्ये मंत्रसामर्थ्य आहे अशीच कल्पना यामागे असली पाहिजे. सामवेदाच्या 'सामविधानब्राह्मण' या विभागात यातुविद्येलाच महत्त्व दिले आहे. ऋग्वेद आणि यजुर्वेद यातील मंत्रपठण दुसऱ्याच्या कानी पडताच थांबविले पाहिजे हा स्मृतिकारांचा दंडक मंत्रपठणामधील यात्वात्मक सामर्थ्यामधूनच उद्भवला आहे. छांदोग्य उपनिषदामध्ये वाणी, छंद, सामगान आणि त्यांचे कामनापूर्तिकर्मातील स्थान यांचे विस्तृत विवेचन आले आहे. अध्यात्मवाद हेच उपनिषदांचे एकमेव वैशिष्ट्य मानणाऱ्या पंडितांना छांदोग्याच्या या अंगाकडे दुर्लक्ष करावे लागले आहे. 'छांदोग्य' हे नावच त्यातील विषयावर प्रकाश टाकणारे आहे. "Chandoga means 'chandas-singer', and Chands combines in itself the meaning 'magic song', 'sacred text', and 'metre'." [15] मंत्रोच्चारामध्ये छंदांना फार महत्त्व आहे. ऋचांचे ताल-लय-बद्ध गान म्हणजे छंदोगान. गायत्री, उष्णिः, बृहति, पंक्ति, जगती, विरज इ. पैकी कोणते छंद कोणत्या कामनापूर्तीसाठी वापरावयाचे याची माहिती ऐतरेय ब्राह्मणामध्ये विस्ताराने दिली आहे. "... Jagati verses should he use who desires cattle ... Viraj verses should he use who desires proper food; the Viraj is food ... [16]" देवांना जेव्हा मृत्यूचे ( मृत्यु = भूक बृ. आँ. उ. ) भय वाटले तेव्हा त्यांनी छंदांचा आश्रय केला असे छांदोग्य उपनिषद् सांगते. [18] छंदांतील ताल-लय-बद्धतेत मंत्रसामर्थ्य आहे असे यावरून दिसून येते. छंदगानाचे कामनापूर्तीतील महत्त्व पुढील उद्गारावरून ध्यानात येऊ शकेल :

१३. छांदोग्यउपनिषदामध्ये मंत्रगानाचा विस्तृत विचार केलेला असल्याने हे उपनिषद् सामवेदाचे परिशिष्ट म्हणून यावे हे स्वाभाविक आहे. या उपनिषदाचा विषय एकच नसून अनेक विषय विस्कळीतपणे एकत्र आणलेले आहेत. परंतु याचा मुख्य विषय 'मंत्रगान' हाच असला पाहिजे हे याच्या नावावरूनही स्पष्ट होते.

१४. छां. उ. १·१·२ ह्यूमच्या भाषांतरावरून

१५. Winternitz : H. I. L.

१६. Keith : R. V. Br. 110.

१७. बृ. आ. उ. १·२·१

१८. छां. उ. १·४·२

" Therefore an Udgith–Singer who knows this may say : " What desires may I win for you by *Singing?* For he is lord of the *winning of desires* by *singing*. Who, knowing this, Sings the *Saman* — yea, Sings the *Saman*.[19] " " Let me obtain immortality for the Gods by *Singing* ... Let me obtain oblation for the fathers by *Singing*, hope for men, grass and water for, cattle ... ... food for myself ( atman ) ' — one should *Sing* the Strotra carefully, meditating these things in mind.[20] (छां. ii. २२.२) ऋग्वेदातही 'सामगाना'चे महत्त्व अनेक ऋचातून वर्णिले आहे. ( सामगान = Singing of songs ) ऋ. ६.४०.१, २.६.१, २.२०.५, २.२१.५, २.४३.१, ३.५.२, ३.२६.१, १.११७.१ या व यासारख्या अनेक ऋचा दाखविता येतील. विशेषतः २.४३.१ मधील गायत्री आणि त्रिष्टुभ यांचा उल्लेख अर्थपूर्ण आहे. " प्रदक्षिणिदभि गृणन्ति कारवो । वयो वदन्त ऋतुथा शकुन्तयः । उभे वाचौ वदति सामगा इव । गायत्रं च त्रैष्टुभं चानु राजति ॥ " घोरपुत्र कण्व मरुताना म्हणतो " मिमीहि श्लोकमास्ये पर्जन्य इव ततनः, गाय गायत्रमुक्थ्यम् १.३८.१४ ( Make hymns by your mouth, spread these like the cloud [ rains ]; Sing the Ukthya [ loudatory hymn ] in Gayatri metre. " )

या ठिकाणी ऋषि मंत्रगायनाने कामनांचा वर्षाव अपेक्षितो आहे. ऋग्वेदातील हे सर्व यात्वात्मक मंत्र इहलोकपरकामनापूर्तीसाठीच आहेत यात आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. ईश्वर, आत्मा, मोक्ष या कल्पनांचा अद्यापि उदय व्हावयाचा होता. हे सर्व मंत्र म्हणजे 'प्रार्थना' नसून 'उद्‌गीथ' स्वरूपाचेच आहेत.

### वैदिक आर्यांचा अन्नब्रह्मवाद

वैदिक आर्य आणि त्यांचे पूर्वज हे जीवनाच्या पहिल्या दुसऱ्या पायरीवरच असल्याने त्यांचे प्रारंभीचे सर्व 'काव्य' ( मंत्र ) अन्नस्तवनपर अथवा अन्नधनप्राप्तीसाठी केलेले उद्‌गान असावे हे साहजिक आहे. त्यांचे देवही अन्न स्वरूपच आहेत. ऋग्वेदातील १.१८७ हे पूर्ण सूक्त अन्नदेवाच्या स्तवनाप्रीत्यर्थ रचिले आहे. या पितुसूक्तातील ( पितु=अन्न ) काही अत्यंत उत्कट आणि भावपूर्ण आहेत. स्वादो पितो, मधो पितो...... " " करम्भ ओषधे ...... " " तव त्ये पितो रसा...... " " यद्दो पितो अजगन्......" " उप नः पितवा चर... " इ. मंत्रातील अन्नविषयक कामना इतकी उत्कट आहे की वेदातील आशयाला तत्त्वज्ञान हे नाव द्यावयाचे ठरल्यास त्याला 'अन्नब्रह्मवाद' हेच नाव द्यावे लागेल. ऋ. २.२४.१५ या ऋचेमधील ब्रह्मणस्पतीला केलेले आवाहन पाहा : " ब्रह्मणस्पते सुयमस्य विश्वहा । रायः स्याम रथ्यो वयस्वतः । वीरेषु वीराँ उप पृङ्ग्धि नस्त्वं यदीशानो ब्रह्मणा वेषि मे हवम् ॥ " यातील ब्रह्मणस्पति शब्दाची सायणाचार्यांनी निघंटूच्या आधारे दिलेली व्युत्पत्ति उद्‌बोधक आहे : " ब्रह्मणः अन्नस्य परिवृधस्य कर्मणः वा पतिः पालयिता " ( अन्ननिर्मितीच्या कर्मांचे पोषण करणारा ) निघंटूमध्ये 'ब्रह्म' हा शब्द 'अन्न' शब्दाचा समानार्थक शब्द म्हणून दिला आहे. ( ब्रह्म=अन्न=पितु ) ऋग्वेदातील असंख्य ऋचातून धन–अन्न–संपत्ति यासाठी आवाहन केलेले आहे. निघंटुकारानी दिलेल्या अन्नवाचक शब्दांची आणि त्यांच्या तद्भवांची नुसती संख्या[21] पाहिली तरी ऋग्वेदातील इहलोकपरतेची काहीशी कल्पना येऊ शकेल. अर्थात् एवढ्याने या अन्नब्रह्मवादाचे खरे स्वरूप नीट ध्यानात येणार नाही. जिज्ञासूंनी सर्वच ऋचांचा

१९. छां. उ. १.७.८ – ह्यूमच्या भाषांतरावरून

२०. छां. उ. २.२२.२ " "

२१. वाज. ५१८, पय ११३, श्रावः २१८, पितु ६१, वाय २४, सुत १८१, अवः २२९, क्षु १४, इळा ५८, इषं २५३, रस ६४, अन्न ५३, ब्रह्म २३२ इ. सुमारे ३००० ऋचांत अन्नवाचक शब्दांचा प्रत्यक्ष उल्लेख आला आहे.

आशय तपासून पाहावा. ऋग्वेदामध्ये केवळ देवतांचे उल्लेख आहेत एवढ्यावरून वैदिक ऋषींना आत्मा, मोक्ष, ईश्वर एतद्विषयक स्पष्ट जाणीव झाली होती असे म्हणता येत नाही. वैदिक देवतांचे मानवी स्वरूप यापूर्वी आपण पाहिलेच आहे. वैदिक वाङ्मयाच्या शेवटच्या स्तरात 'देव' कल्पनेचा विकास होऊन अध्यात्मवादाचा प्रारंभ झालेला दिसतो. तत्पूर्वीचे वैदिक वाङ्मय पूर्णपणे भौतिक जीवनाशीच निगडित होते असे दिसून येईल.

इंद्र, अग्नि, मरुत्, सरस्वति इ. देवतांची ब्रिरुदे अन्न-धनवाचकच आहेत. रत्नधा, वसुवित्, वाजद, वाजप्रसूत, मघवान्, इषायन्तः, वाजंभरः, वाजवन्तः, रयिपतिः अन्नवृध्, अर्किन् इ. अर्किन् ही संज्ञा एके ठिकाणी मरुद्गणांना तर अन्यत्र मानवांना उद्देशून वापरली आहे. (१·७·१) 'वाजयन्[२२]' या संज्ञेचा सायणांनीही 'अन्ननिर्मिति करताना' असाच अर्थ केला आहे. इंद्र, सोम, अग्नि, रिभु यांच्या संदर्भात हा शब्द अनेक वेळा आला आहे.

उत्तरकालीन वाङ्मयात शब्द तेच राहिले पण त्यांचा आशय बदलला. मूळ भौतिक आशयाच्या जागी आध्यात्मिक आशय प्रस्थापित झाला. एवढ्यावरून अनेक पंडित ऋग्वेदातून अध्यात्मवादी संदेश शोधून काढण्याचा प्रयत्न करतात. भग-भाग = संपत्ति, संपत्तीचा वाटा हा अर्थ जाऊन भगवान् = ईश्वर असा अर्थ आला. पण ईश्वर शब्दाचे मूळ अर्थ राष्ट्री, आर्य, नियुत्वान्, इनैन असे आहेत (निघंटु). या सर्वांचे धात्वर्थ 'वृद्धि करणे, समृद्धि करणे' या क्रियेशी संबंधित आहेत. ही समृद्धि अन्न, धन, प्रजा यांचीच असली पाहिजे हे आतापर्यंतच्या विवेचनावरून ध्यानात येऊ शकेल.

अगदी अलीकडेपर्यंत गोपालन अवस्थेत असणाऱ्या वन्य मानवसमूहांच्या प्रार्थनांचे अवलोकन केल्यास त्यांच्या आणि वैदिक आर्यांच्या जीवनपद्धतीतील साधर्म्य ध्यानात येऊ शकेल. वैदिक आर्य अथवा त्यांनजवळचे पूर्वज अद्यापि सामूहिक जीवन जगणाऱ्या गणसमाजात (Tribal Society) राहात होते, किंवा नुकतेच त्या अवस्थेतून बाहेर पडले होते. गणजीवी समाजातील अनेक विशेष वैदिक वाङ्मयात प्रत्ययाला येतात.

या अवस्थेत आर्थिक अगर सामाजिक विषमतेचा अंशही आढळून येत नाही; कारण विषमता निर्माण होण्याजोगे अन्नाचे उत्पादनच होत नसते. अद्यापि समाजात वर्ग-वर्णभेद निर्माण झालेले नसतात. Tribe चे सर्व व्यवहार सर्वानुमते [२२अ] होतात. अद्यापि विवाहसंस्था उदयाला आलेली नसल्याने या समाजातील नीति-अनीति-कल्पना उत्तरकालीन कल्पनांहून सर्वस्वी भिन्न असतात. सामूहिकता हा या समाजजीवनाचा सर्वांत महत्त्वाचा विशेष होय. सामूहिक जीवनात व्यक्तीला स्वतंत्र अस्तित्वच नसते. 'मी', 'माझे', 'तुझे' या कल्पनांची जाणीव नसल्याने उपभोग्य वस्तूंची समानवाटणी हा या समाजपद्धतीचा अंगभूत विशेषच मानावा लागतो. उत्पादनपद्धतीमध्ये विकास होऊन संपत्तीचा (उपभोग्य धन) संचय होऊ लागताच समाजात वर्ग-वर्णभेद निर्माण होऊ लागतात. सर्वांनीच श्रम करावेत आणि सर्वांनीच अन्नप्राप्तीसाठी मंत्रपठण करावे ही वर्गविहीन समाजातील व्यवस्था लुप्त होऊन नव्या वर्गीय समाजात श्रम करणारे, मंत्रपठण करणारे असे वर्णवर्गभेद पडू लागतात. या नव्या वर्गीय समाजाचे समर्थन करण्यासाठी देव, धर्म, मोक्ष, परलोक इ. कल्पनांचा उपयोग सुरू होतो.

वैदिक आर्य जेव्हा भारतात आले तेव्हा ते गोपालन समाजाच्या बऱ्याच उत्तरकालीन अवस्थेत असावेत. पूर्वीच्या वर्गविहीन समाजाची विघटना सुरू झाली असावी. पूर्वीची सामूहिकता, संपूर्ण समता याचा लोप होऊन वर्गीय समाज उदयाला येऊ लागला असावा. प्राचीन काळातील आदर्श सामूहिक जीवनाचे गोडवे गाणारे ऋषी त्या जीवनाचा शेवट झाल्याबद्दल दुःखोद्गार काढतानाही आढळतात. "The Rigveda as a whole was the literature of

२२. ऋ. ९·६८·४, ८·९८·१२, १·३०·१ इ.

२२ अ. सभा, समिति, विदथ ही नावे ऋग्वेदामध्ये शासनमंडल, सभागृह या अर्थाने येतात. येथे एकत्र जमून निर्णय घेतले जात. यांचा नंतर स्वतंत्र विचार केला आहे.










a long transitional period, retaining on the one hand, the memory — and sometimes even the reflection — of the pre-class society along with its characteristic beliefs and customs, while on the other hand, foreshadowing the realities of the class divided society"[२३]

ऋग्वेदातील गणांचे वैभव हे प्राचीन काळातील वर्गविहीन समाजातील 'ऋत'युक्त सामूहिक जीवनाचे वैभव होय. वैदिक ऋषींनी या गणवैभवाचे मुक्तकंठाने गान[२४] केले आहे. 'व्रात' हा वैदिक वाङ्मयातील शब्द गणवाचकच आहे. 'गणा'प्रमाणेच यातील आशयही प्रारंभी गौरवास्पदच होता. वैदिक ऋषींनी व्रातांचे गौरवपूर्ण स्तवन केलेले आढळते. अथर्ववेदामध्ये तर व्राताला पुरुषसूक्तातील 'विराट पुरुषा'ची प्रतिष्ठा लाभलेली[२५] दिसते. परंतु उत्तर कालात वर्गीय समाजनिर्मितीबरोबर गण आणि व्रात यांचे वैभव लुप्त होऊ लागले. सांस्कृतिक दृष्ट्या श्रेष्ठ कनिष्ठ असे वर्ण निर्माण झाले आणि गणजीवी-व्रातजीवी समाज हीन समजले जाऊ लागले. सर्वत्र गण-निंदा,[२६] व्रातनिंदा सुरू झाली. महाभारतातील आणि सूत्रवाङ्मयातील गणनिंदा ही या सामाजिक परिवर्तनाची निदर्शक आहे. व्रातजीवी लोक 'व्रात्य' बनले. 'व्रात्य' म्हणजे व्रातात राहातात ते; परंतु स्मृतिकार व्रात्य शब्दाचा अर्थ पतित, संस्कारच्युत असा देतात. काही स्मृतिकार तर 'व्रात्य' म्हणजे वर्णसंकरजप्रजा असा अर्थ देतात. परंतु एकेवेळी आर्य लोक गणजीवी-व्रातजीवी असल्यामुळे गणांचे-व्रातांचे वैभव मुक्तकंठाने गाण्यात त्यांना संकोच वाटत नव्हता. पुढे गणांच्या विघटनेने वर्गीय समाज उदयाला आला आणि त्यातूनच शासनसंस्थेचा जन्म झाला. गणांच्या विनाशावरच राज्यसंस्थेची (State) उभारणी होत असल्याने नव्या युगात राज्यसंस्थेचे समर्थन करण्याच्या उद्देशाने ब्राह्मण स्मृतिकारांनी गण-व्रातनिंदा सुरू करावी हे स्वाभाविक होते.

गणजीवी समाजाचे विघटन सुरू होण्यापूर्वीच्या सामूहिक जीवनाचे अनेक गौरवपूर्ण उल्लेख वैदिक वाङ्मयात आढळतात. ऋ. ७·७६ या सूक्तांतील पुढील दोन ऋचा पाहा: "त इद् देवानां सधमाद आसन्नृतावानः कवयः पूर्व्यासः" (Those ancient poets, the observers of *Rita* were in joyful company with the Gods). यातील 'ऋत' म्हणजे प्राचीन सामूहिक जीवनातील आदर्श समता, निर्मत्सरता, हे वर्गविहीन समाजातील विशेष असावेत काय ? यापुढील ऋचेवरून हे अनुमान संभाव्य वाटते. "समान ऊर्वे अधि सं गतासः सं जानते न यतन्ते मिथस्ते । ते देवानां न मिनन्ति व्रता न्यमर्धन्तो वसुभिर्दायमानाः ॥"[२७] (Being united with the

२३. देवीप्रसाद चटोपाध्याय : लोकायत ५५६

२४. ऋ. १०.११२.९ — इंद्राला गणपति म्हणून आवाहन केले आहे.
"गणानाम् त्वा गणपति ..." २.२३.१
'गणेभ्यः स्वाहा ...' अथर्व. १९.२२.१६
"नमो गणेभ्यो गणपतिभ्यश्च वो नमो व्रातेभ्यो व्रातपतिभ्यश्च वो नमो नमो (वा. सं. १६.२५)

२५. "तस्य व्रातस्य ॥ यदस्य दक्षिणमक्ष्यसौ स आदित्यो यदस्य सव्यमक्ष्यसौ स चन्द्रमाः । योऽस्य दक्षिणः कर्णोऽयं सो अग्निर्योऽस्य सव्यः कर्णोऽयं स पवमानः ॥ अहोरात्रे नासिके दितिश्चादितिश्च शीर्षकपाले संवत्सरः शिरः ॥ अह्राप्रत्यङ्व्रात्यो रात्र्याः प्राङ्नमोव्रात्याय ॥ अथर्ववेद : १५·३·१–५ या मंत्रावर भाष्य करताना सायणाचार्यसुद्धा गोंधळून गेले. कारण त्यांना स्मृतिकारांनी निंद्य ठरविलेला व्रात तेवढाच माहीत होता. तेव्हा त्यांनी अथर्ववेदांतील हा 'व्रात' अपवादात्मक ठरवून मार्ग काढला.

२६. याज्ञवल्क्यस्मृतिः १.२७१; मनुस्मृतिः ३.१६४; महाभारत : ८.१५२; रे यांचे भाषांतर.

२७. ऋ. ७,७६.४–५



अनुक्रमणिका






common Cattle they became of one mind; they strive together as it were, nor do they injure the rituals of the Gods; not injuring eachother they move with wealth.) यांतील प्राचीन काळातील सामूहिक जीवनाने प्राप्त होणाऱ्या वैभवाचा उल्लेख महत्त्वाचा आहे. 'समान ऊर्वे' यावरील सायणाचार्यांचे भाष्य पुढीलप्रमाणे आहे : 'सर्वेषां साधारणे गोसमूहे'. संजानते– 'ते एकबुद्धयः भवन्ति' देव या काळात केवळ यज्ञातील आहुति घेण्यासाठी येत नसत. ते स्वतः यज्ञ करीत. मानवामानवांमध्ये अथवा मानव आणि देव यांमध्ये मत्सरभावना नव्हती. समानत्वाच्या भूमिकेवरून एकमनाने, एक बुद्धीने ते सर्वजण संपत्तीची निर्मिति करीत. या ऋचेतील हे प्राचीन कवी म्हणजे समूहजीवी अंगीरस होत.

"स पूर्वव्ज्जनयज्जन्तवेधनं समानमज्मं पर्येति जागृविः" (३.२.१२); "... समानंनाम धेनु पत्यमानम्" (६.६६.१); "समानमिन्द्रमवसे हवामहे। वसवानं वसूजुवम्।" (८.९९.८) "ऋतस्य धेना अनयन्त सस्त्रुतः" १.१४१.१ (सस्त्रुतः = समानं गच्छंत्यः – सायण) या सर्व ऋचातील सामूहिकतेचे आणि समानतेचे उल्लेख लक्ष्य आहेत. या सामूहिकतेचा गौरव १० व्या मंडलामध्येही आढळतो. "संगच्छध्वं सं वदध्वं। सं वो मनांसि जानताम्। देवा भागं यथापूर्वे संजानाना उपासते॥ समानो मंत्रः समितिः समानी। समानं मनः सहचित्तमेषाम्। समानं मंत्रमभि मन्त्रये वः समानेन वो हविषा जुहोमि॥" (१०.१९१.२-३).

ऋग्वेदाचे १० वे मंडल हे उत्तरकालीन समजले जाते. तेव्हा हा सामूहिकतेचा गौरव प्राचीनकाळातील असला पाहिजे. "ज्याप्रमाणे प्राचीनकाळी देव सामूहिक पद्धतीने आपला भाग घेत..." या उद्गारावरून प्राचीन काळाचा स्पष्ट बोध होतो. भाग कल्पनेचा नंतर विचार करू. सर्व समाजाचे एकत्र अन्नग्रहण आणि अन्नाची समान विभागणी यांचा अथर्ववेदातील पुढील उल्लेख महत्त्वाचा आहे : "समानी प्रपा सह वोऽन्नभागः समाने योक्त्रे सहवो युनज्मि।..." (अथ. ३.३०.६) याच्या पुढच्याच मंत्राचे भाषांतर पाहा : "Having superiors, intentful, be ye not divided, accomplishing together, moving on with joint labour; come hither speaking what is agreeable to one another; I make you united, like-minded."[२८] समाजामध्ये सामूहिकता आणि एकता साधण्यासाठी जो विधि अथर्ववेदात सांगितला आहे त्यापैकी हे मंत्र आहेत (सांमनस्यानि ३.३०) विधियुक्त मंत्रपठणाने प्राचीन काळातील ती, आदर्श सामूहिकता आणि एकता नव्या वर्गीय समाजाला जाणवावी हा मंत्रकर्त्याचा उद्देश दिसतो. कौशिक सूत्रामध्ये ही कल्पना स्पष्ट करून तत्प्रीत्यर्थ करावयाचा विधि सांगितला आहे.

नव्या समाजपद्धतीत पूर्वीची सामूहिकता आणि समता यांचा लोप झाला. पूर्वीचे देव इतर मानवांच्या बरोबर समान भाग घेत; पण ऋग्वेदाच्या ७ व्या मंडलामध्ये इंद्र संपत्तीचा अधिकाधिक वाटा मागताना दिसतो.[२९] एके वेळचा ऋताचा पालक वरुण नव्या युगात शायलॉकच्या वृत्तीने नरबलीसाठी हटून बसतो.[३०] ते प्राचीन काळातील समानतेचे, निर्मत्सर जीवनाचे दिवस आता राहिले नव्हते. 'ऋता' चा लोप झाल्याबद्दल ऋषि दुःखोद्गार काढताना आढळतात.[३१] या वर्गीय समाजाकडे वळण्यापूर्वी प्राचीन वैदिक आर्यांच्या गणजीवी सामूहिक जीवनातील आणखी काही महत्त्वाच्या कल्पनांचा विचार करू.

२८. अ. वे. ३.३०.६-७

२९. ऋ. ७.३२.१२

३०. ऐतरेय ब्राह्मण

३१. "क ऋतं पूर्व्यं गतं कस्तद् बिभर्ति नूतनो..." इ. ऋ. १.१०५.४, १.१०५.५.
'कद् व ऋतस्य धर्णसि कद् वरुणस्य चक्षणम्' १.१०५.६
"... नव्यो जायताम् ऋतं ..." (Let The Rit be born anew ऋ. १.१०५.१५)

## सभा, समिति, विदथ

ऋग्वेदामध्ये सभा, समिति, विदथ हे शब्द अनेक ऋचातून आलेले आढळतात. जवळ जवळ एकाच अर्थाचे (= गणसभा, सभागृह) हे तीन शब्द वैदिक आर्यांच्या शासकीय व्यवस्थेवर प्रकाश टाकणारे, आहेत. त्याचे मर्म समजून घेण्यासाठी 'ट्रायबल' समाजाच्या शासनव्यवस्थेचा परिचय करून घेणे आवश्यक आहे.

प्रत्येक गण (Tribe) अनेक कुलांचा (Clan or gen) बनलेला असतो. या कुलांचा अंतर्गत व्यवहार कुलातील सर्व सभासद एकत्र जमून पाहतात ही **कुलसभा** (Clan Council) होय. प्रत्येक कुलातून निवडून आलेले कुलप्रमुख एकत्र येऊन गणाचा कारभार पाहतात. ही कुलप्रमुखांची सभा म्हणजे **गणसभा** (Tribal Council) होय. याशिवाय एक 'सांस्कृतिक' मंडळ असते. (Body of the keepers of Faith) हे मंडळ गणाच्या 'धार्मिक' जीवनाचा विचार करते. अशा प्रकारे गणाची शासनव्यवस्था पूर्णपणे लोकशाही स्वरूपाची असते. वैदिक आर्यांची समाजरचना सामूहिक गणजीवी पद्धतीचीच असल्यामुळे त्यांच्या शासनपद्धतीचे स्वरूप वरीलप्रमाणेच असले पाहिजे. ऋग्वेदांतील 'सभा' ही वरिष्ठ वर्णीयांची संस्था असावी असा जो काही युरोपियन पंडितांनी तर्क केला आहे तो बरोबर नाही. ऋग्वेदांतील २.२४.१३ व ४.२.५ या ऋचांमध्ये 'सभेय विप्र', 'रयिः' आणि 'सभावान्' असे उल्लेख आलेले आहेत; यावरून वरील अपसमज निर्माण झाला. विप्र = मेधावी, बुद्धिमान असाच अर्थ सायणाचार्यांनीही घेतला आहे. आणि दुसऱ्या ऋचेतील रयिः = संपत्ति हा शब्द अग्नीला उद्देशून आलेला असल्यामुळे सभा ही केवळ ब्राह्मण व धनिक यांचीच संस्था असावी हा तर्क चुकीचा ठरतो. ऋग्वेद-काळात वर्णव्यवस्था सुरू झाल्याचा निर्णायक पुरावा मुळीच उपलब्ध नाही. उत्तरकालीन ऋचांमध्ये (१० वे मंडल) मात्र असा उल्लेख आढळतो. तेव्हा अति प्राचीन काळांतील 'सभा' ही **कुलसभा** अथवा **गणसभाच** असावी. बुद्धिमान आणि कर्तबगार नेते सभेत एकत्र जमून गणशासन पाहात असले पाहिजेत. ऋ. १०.९७.६ या ऋचेमध्ये 'राजे (राजानः) ज्याप्रमाणे समितीमध्ये उपस्थित राहतात' असा उल्लेख आहे. 'राजानः' या अनेक वचनावरून ते कुल-प्रमुखच असावेत. राजा = King, Monarch हा अर्थ येथे अभिप्रेत असणे शक्य नाही. समिति हा शब्द युद्धवाचक[३१अ] आहे. (Assembly of war Chiefs) तेव्हा समितीत येणारे 'राजे' म्हणजे गणांतील नेतेमंडळी. ऋ. १०.३४.१२ मध्ये 'राजा व्रातस्य- गणस्य सेनानी' असा उल्लेख आहे. यावरू-नही वरील अर्थच निश्चित होतो. अथर्ववेदात या राजांची निवड (election) होते असा स्पष्ट उल्लेख आहे. या सर्व पुराव्यांवरून 'सभा' म्हणजे 'गणसभा' अथवा 'कुलसभा'च असली पाहिजे हे स्पष्ट होते. (३.४.२) विदथ हा शब्द सभा शब्दाहून प्राचीन असला पाहिजे. येथे सभासदांची भाषणे होत. (ऋ. २.१२.१५, २.१.१६; ऋग्वेदाचे दुसरे मंडळ हे अतिप्राचीन आहे.) अंतर्गत झगडयांचा न्याय-निवाडा होई. (१.३१.६, ७.९३.५) 'विदथा'-मध्ये धनाची, अन्नाची विभागणी केली जाई अशा अर्थाचे असंख्य उल्लेख आहेत. अन्नाची विभागणी हा प्राचीन गणजीवी समाजाचा एक महत्त्वाचा विशेष आहे. गणजीवी समाजाची विघटना होऊन हे अन्न-धन विभाजनाचे कार्य बंद झाले तेव्हा 'विदथ' ही सभाही लुप्त झाली. नव्या परिस्थितीत समितीला महत्त्व यावे हे स्वाभाविक होते. Tribal Democracy जाऊन Military Democracy आली. वरुणाचे ऋतयुग संपून इंद्राचे युद्धयुग सुरू झाले. म्हणूनच उत्तरकालीन ऋग्वेद-ऋचांमध्ये 'सभा' अगर 'विदथ' यांचे महत्त्व कमी होऊन 'समिती'ला महत्त्व आले. हळूहळू युद्धनेते (गणस्य सेनानी) हे नव्या अर्थाने राजे (king) बनले. keepers of Faith आणि Warchiefs यांच्यामध्ये उत्तरकालीन ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचे बीजरूपाने दर्शन होते.

सामूहिक गणजीवी समाजाची विघटना सुरू झाल्याने धनाची समान वाटणी संपली. इंद्र आता

---

३१ अ. निघंटु : II. १७; (संग्रामनामनि)

अधिक धनासाठी हटून बसताना दिसतो. थोडक्यात म्हणजे पूर्वीची गणजीवी समाजातील लोकशाही शासन-व्यवस्था नव्या युगात लुप्त झाली.

### भाग आणि अंश

वैदिक कवि अनेक ऋचातून संपत्तीचा-अन्नाचा वाटा मागताना दिसतात. इंद्र, अग्नी, सावित्री, उषा या देवता धनाचे विभाजन करण्यासाठी सभेमध्ये येतात.[३२] 'धनाची वाटणी करणारे' असाच त्यांचा उल्लेख आढळतो. सावित्रीला एका ऋचेमध्ये '**भग-भक्त**[३३]' म्हटले आहे. भग = संपत्ति, संपत्तीचा वाटा (भाग). एकच शब्द या दोन अर्थांनी येतो यात एक रहस्य दडलेले आहे. '**संपत्ति म्हणजे समूहामध्ये विभागली जाणारी उपभोग्य वस्तु.**' संपत्ति ही वैयक्तिक संग्रहासाठी नसतेच. विभाजन हेच तिचे अंगभूत वैशिष्ट्य. वर्य = संपत्ति हा शब्द 'वर्याणाम्' असा अनेक वचनीही येतो. या स्वरूपात याचा अर्थ 'गवादि धनानाम्[३४]' अथवा 'वृहि-यवादीनाम्'[३५] असा सायणाचार्य करतात. गोधन अथवा धान्य हीच आर्यांची संपत्ति; आणि ही संपत्ति विभाजनासाठीच असे. वर्य शब्द मूळ 'वृम्' धातूपासून आला आहे. वृम = वाटणे. वैदिक आर्य समाजात विभाजनक्रियेला अतिशय महत्त्व आलेले दिसते. 'भाग आणि अंश' या कल्पनांना देवत्व प्राप्त झाले आहे. याचे हेच रहस्य होय.

प्राथमिक गणजीवी समाजात उपभोग्य वस्तूंची निर्मिति आणि विभाजन या दोनही क्रिया सामूहिकच असणे अपरिहार्य असते. या सामूहिकतेमध्येच समानता समाविष्ट असते. कित्येक वेळा समान विभागणीची कल्पना पराकोटीला गेलेली आढळते. फ्यूजियन ट्राइब्जबद्दल लिहिताना डार्विन म्हणतो की या टोळीतील लोकांना जरी एक कापडाचा तुकडा दिला तरी त्याच्या चिंध्या करून ते त्यांची समान वाटणी करतील. अन्ननिर्मितीच्या प्राथमिक अवस्थेमुळे ही सक्तीची समानता एक अनिवार्यच घटना बनलेली असते. यातील सक्ती ही जाचक नसून तिला एक प्रकारचे पावित्र्य आलेले असते. ऑस्ट्रेलियन ट्राइब्जचे वर्णन करताना रिडले म्हणतो : "A Venerable law handed down from many generations imposed the division upon them."[३६] लाहॉटनने या लोकांच्या 'उदात्त' जीवनाचा गौरव करताना पुढील उद्गार काढले आहेत :

"These savages know nothing of 'mine' and 'thine'... They think it strange that someone should have more goods than others, and that those who have more should be more esteemed than those who have less. They never quarrel and fight amongst themselves nor steal from one another, or speak ill of one another." [७]

वैदिक आर्य या अवस्थेतून पुढे गेले होते हे खरे; परंतु पूर्वजांच्या जीवनातील या समान विभाजन तत्त्वाच्या स्मृति त्यांच्या मनात रेंगाळत असाव्यात. अन्नाचे-धनाचे सामूहिक विभाजन ही घटना इतकी पूज्य मानली गेली की उत्तरकाळात तिला देवत्व प्राप्त झाले. ऋग्वेदाच्या ७ व्या मंडलातील ४१ वे सूक्त 'भाग-अंश' या देवतेप्रीत्यर्थ रचिले गेले. संपत्तीची वाटणी करण्यासाठी सभेमध्ये उपस्थित झालेल्या देवांना 'वाजानाम् विभक्तः'[३८] (वाज=अन्न, धन) या नावाने संबोधिले आहे.

---

३२. ऋ. १·२७·६, १·२२·७, १·१२३·३ इ.

३३. ऋ. १·२२·७

३४. ऋ. ८·७१·११ वरील सायणभाष्य

३५. ऋ. १०·९·५ वरील सायणभाष्य

३६. Ridley : The Aborigines of Australia

३७. ब्रिफॉल्च्या Mothers वरून देवीप्रसादांनी घेतलेले अवतरण.

३८. ऋ. ३·४९·४, ६·३६·१ (वाजानाम् अभवो विभक्तः)



अनुक्रमणिका

प्राचीन ग्रीक गणजीवी समाजातील Moira[३९] नावाची देवता या संदर्भात लक्षणीय आहे. Moira= भाग; वाटा, विभाजनदेवता ( भाग-भक्त ). Moira या शब्दाशी निगडित Lachos हा शब्दही याच अर्थाचा पण किंचित् वेगळी छटा दाखविणारा आहे. Lachos = चिठ्ठी ( Lot ) टाकून सभासदाच्या वाटणीला आलेला भाग किंवा वाटा. यावरून Lachesis म्हणजे 'दैव' अथवा 'अदृष्ट' यावर अधिष्ठित असलेली देवता असा अर्थ आला. प्राचीन गणसमाजात धनाचा वाटा 'लॉट' टाकून उचलावयास सांगत असावेत. याकाळी Moira अथवा Lachesis या शब्दांचा अर्थ Goddess of allotment असा होता. पुढे जेव्हा समान वाटणीचे तत्त्व मागे पडले ( वर्गीय समाजात ) तेव्हा या शब्दांना Goddess of Fate असा अर्थ आला. " In ancient times, Plutarch writes, when meals were admiuistered by Moira or Lachesis on the principle of equality, everything was decently and liberally arranged; and in support of this contention he points out that the old word for a *meal meant properly a division.* " या ठिकाणी भग, भाग, वर्य या शब्दांचे मागे केलेले विवेचन ध्यानात यावे. भग=संपत्ति; भाग=वाटा; यातील मूळधातू भाज्=वाटणी करणे हाच आहे. वर्य < वृम् = वाटणी करणे. धन अगर संपत्ति म्हणजे वाटणी करण्याची वस्तु हा अर्थ मागे पाहिलाच आहे. परंतु पुढे जेव्हा 'भगा'चे 'भाग' पाडणे बंद झाले तेव्हा भग=दैव, अदृष्ट ( Lachesis–Luck ) हा अर्थ आला असावा. समान वाटणीचे तत्त्व जाऊन 'दैवाधीन' प्रातीचा काळ आला. ग्रीक आणि वैदिक आर्य समाजातील प्राचीन कल्पनांचा हा समान विकास केवळ योगायोग म्हणून दुर्लक्षिता येणार नाही.

ग्रीक समाजात प्राचीन काळी धनाची वाटणी लॉट्स टाकून करीत. प्राग्वैदिकांच्या जीवनातही अशीच पद्धति असावी असे म्हणण्याला आधार आहे. ऋग्वेदातील 'अक्ष'सूक्ताचा या संदर्भातच अर्थ लागू शकेल. सूक्तामध्ये अक्ष=जुवा असा स्पष्ट अर्थ आहे. पण एवढ्याने निर्वाह होत नाही. वैदिक ऋषींच्या कल्पनेप्रमाणे प्रत्येक सूक्ताला अधिष्ठात्री देवता असावी लागते. अक्षसूक्ताची देवता सांगताना सूक्तकाराने **अक्ष-कृषि-प्रशंसा** आणि **अक्ष-कितव-निंदा** असे दोन विभाग केले. यावरून 'अक्षा'ची दोन भिन्न कार्ये असावीत हे स्पष्ट दिसते : ( १ ) शेतीविषयक प्रशंसापर, आणि ( २ ) निंद्य जुगार. अक्षकृषिसूक्तातील शेतीचा उल्लेख लक्षणीय आहे. बहुतेक सर्व पंडितांनी या अक्ष-कृषि-प्रशंसेचा विचारही केलेला नाही; कारण त्यांना फक्त अक्ष = जुवा एवढाच अर्थ समजला. 'अक्षा'चे दुसरे कार्य कोणीही विचारात घेतलेले नाही. धनाची अगर उत्तरकालात शेतजमिनीची वाटणी 'लॉट्स' टाकून करीत असावेत अशी कल्पना येते. अगदी अलीकडेपर्यंत पेशावर भागातील गणजीवी समाजात शेतीची वाटणी 'लॉट्स' ( अक्ष ) टाकून करीत अशी माहिती बेडन पॉवेलने दिली आहे.[४०] थॉमसनने Studies in Ancient Greek Society या ग्रंथात 'अक्षा'च्या या उपयोगाची अनेक उदाहरणे दिली आहेत. अक्ष-कृषि-प्रशंसा या प्रकरणाचा उलगडा याच पद्धतीने होऊ शकेल. ऋग्वेदातील 'अक्षा'ला धार्मिक महत्त्व ( ritual importance) जे आले आहे ते 'जुगार' या अर्थी असणे शक्य नाही. राजसूय आणि अग्न्याधेय विधीमध्ये हे धार्मिक महत्त्व दिसून येते. वैदिक ऋषींच्या पूर्वजांना ज्या संस्था अगर घटना जीवनोपयोगी ठरल्या त्यांनाच उत्तरकालात धार्मिक महत्त्व आल्याचे दिसून येते. ( उदा. यज्ञ. ).

काही ऋचांमधून देवांना अन्नाचा, धनाचा भाग दिल्याचे उल्लेख[४१] आहेत. पण हा भाग

३९. Thompson : Studies in Ancient Greek Society.

४०. बेडन पॉवेल : The Indian Village Community.

४१. ऋ. १·७३·५, २·२४·१४, १·३५·२ इ.







म्हणजे आहुति नव्हे हें ध्यानात घ्यावयास हवे. देव आणि मानव एकत्र जमून धनाची, अन्नाची वाटणी करीत तेव्हा भाग = वाटा हाच अर्थ होता. वैदिक देव पूर्वी मानवच होते; ते सभेमध्ये बसून आपला वाटा घेत. देव आपापसात धनाची वाटणी करतात. ब्रह्मणस्पति देवांमध्ये गायींची वाटणी करतो; ( २·२४·१४ ) वायूला देव आणि मानव यांमधील त्याचा वाटा मिळतो (१·१३५·२) पुशन्, अग्नी, अश्विनी आपापले वाटे घेतात. या सर्व ऋचातील 'भाग' म्हणजे आहुति असणे शक्य नाही. उत्तरकाळात जेव्हा त्यांचे मनुष्यत्व गळून पडले, मानवसमूहामध्ये येऊन सामूहिक श्रमकर्मात ते जेव्हा भाग घेईनासे झाले तेव्हाच त्यांच्या नावे आहुति दिली जाऊ लागली. 'भाग' शब्द तसाच राहिला, त्याचा आशय मात्र बदलला.

**यज्ञसंस्था**[४२]

प्राथमिक मानवाच्या अन्नोत्पादनकर्माला मंत्रतंत्रात्मक कर्मकांडाची किती आवश्यकता आहे याचा विचार यापूर्वी आपण केला [४३] आहे. विशिष्ट मंत्रोच्चार आणि कर्मकांडात्मक विधि यांच्या साहाय्याने निसर्गावर आपले प्रभुत्व प्रस्थापित करता येते अशा श्रद्धेतून प्राचीन काळातील सर्व कर्मकांडांची निर्मिति झाली आहे. वैदिक आर्यांचा यज्ञविधि हा अशाच प्रकारचा विधि असला पाहिजे हे डॉ. बेलवलकर आणि आर. डी. रानडे यांसारख्या पंडितांनीही मान्य केले[४४] आहे. ऋग्वेदांतील ऋचा हे शुद्ध काव्य नसून त्याचा विनियोग विशिष्ट कर्मकांडांप्रीत्यर्थ आहे हे ब्राह्मणग्रंथांचे म्हणणे खरे आहे. या मंत्रांच्या 'कामवर्षा' या संज्ञेवरून त्यांचे यात्वात्मक सामर्थ्य ( magical potency ) स्पष्ट होते. 'अन्नप्राप्ती' ही वैदिक कवींची प्रधान कामना ध्यानात घेता मूळचा यज्ञविधि आणि वैदिक मंत्र यांचा परस्परसंबंध स्पष्ट व्हावा. मंत्रोच्चारयुक्त यज्ञविधीने मानवाच्या इहलोकपर कामना पूर्ण होतात अशा श्रद्धेनेच प्रथम हा विधि निर्माण झाला असला पाहिजे. अर्थात् हे केवळ अनुमान नाही. ब्राह्मणग्रंथातील पुरावाच आपण यापुढे तपासून पाहू. उत्तरकालात उत्पादन तंत्राचा जेव्हा विकास झाला, तेव्हा अन्ननिर्मितिक्रियेतील मंत्रतंत्रांचे महत्त्व कमी झाले. परंतु कर्मकांडात्मक विधि मात्र नव्या स्वरूपात चालूच राहिले. उत्पादनसाधनांच्या विकासाबरोबर पूर्वीच सामूहिक जीवन संपुष्टात आले आणि समाजात वर्ग-वर्ण संबंध निर्माण झाले. पूर्वीचे सामूहिक स्वरूपाचे 'कर्मकांड' लुप्त होऊन नव्या वर्गीय समाजात वरिष्ठ वर्गाच्या हातातील ते एक साधन बनले.[४५] पूर्वीची मंत्रविद्या आता सर्व समाजाच्या कामनापूर्तीचे कार्य करीत नाही. "... technique of magic is developed by the ruling class as a means of consolidating their privileges by investing them with supernatural sanctions."[४६] उत्तरकालीन यज्ञाला हेच स्वरूप आले.

प्राग्वैदिकांच्या मूळ यज्ञविधीचे स्वरूप कोणत्या प्रकारचे असावे हे पूर्णपणे समजून घेणे आज अशक्य आहे. परंतु ब्राह्मण ग्रंथातील काही उद्गारावरून थोडी फार कल्पना येऊ शकेल. वर उल्लेखिलेल्या सामाजिक आर्थिक स्थित्यंतराबरोबर प्राचीन यज्ञविधीचे स्वरूप पूर्ण पालटून गेले; परंतु उत्तरकालीन ऋषींना या पूर्वीच्या यज्ञविधीची आठवण येत होती. अन्ननिर्मितिक्रियेमध्ये साहाय्यक असा यज्ञ लुप्त झाला याबद्दल या ऋषींना खेद वाटतो. ऐतरेय ब्राह्मणातील पुढील उद्गार पाहा: "The yajna went away from the Gods (saying) 'I shall not be your food.' 'No,' replied the Gods,

४२. 'यज्ञ' म्हणजे वै. आर्यांची सामूहिक अन्ननिर्मितिप्रक्रिया असे कॉ. डांगे यांनी म्हटले आहे. देवीप्रसादांनी यांत जी सुधारणा सुचविली आहे ती महत्वाची आहे यज्ञ हा विधि आहे. प्रत्यक्ष प्रक्रिया नव्हे. वास्तव आणि विधि यात फार मोठे अंतर आहे. विधि ही मानसिक, संस्कारात्मक घटना असते.

४३. नवभारत : फेब्रु. १९६४

४४. History of Indian Pholosophy II. 405

४५. मनु. ११·३३

४६. Thomson : Religion

'verily thou shalt be our food.' मूळ स्वरूपातील यज्ञाचा देवांना ध्यास का लागला होता हे या उद्गारावरून ध्यानात येऊ शकेल. विस्कळित स्वरूपातील 'यज्ञा'च्या दुखापती बऱ्या करण्याविषयी ते अश्विनीकुमारांना आवाहन करतात. "... having gathered it together they said to the Aswins, 'Do ye two heal it...'"[४७] दुसऱ्या एका ठिकाणी ऐतरेय ब्राह्मणात पुढील उद्गार आढळतात :

"The yajna as food departed from the gods; the gods said, 'the yajna as food hath left us; this yajna, food, let us search for.' They said, 'How shall we search?' 'By the Brahman and the *metres*, they said.' "... Having obtained him (yajna), they (the gods) said, 'Serve us for food,' 'No', he replied, 'How can I serve you?' Then he only looked at. To him they Said, 'with the Brahman and the metres becoming united do thou serve us as food.' 'Be it so' (he replied). Therefore now also the yajna becoming united with the Brahman and the metres bears the yajna to the gods."[४८] नव्या युगातील हा यज्ञ आता सर्व समाजाचा राहिला नसून केवळ ब्राह्मणांचा होता हेही ऐतरेय ब्राह्मणात स्पष्ट सांगितले आहे. "... The Brahmans are the offspring that eat the oblations; the Rajanya, Vaisya and Sudras those that do not eat the oblations. *From them the yajna departed.*"[४९] ब्राह्मणांनी आणि इतरांनी यज्ञाला परत आणण्याचा प्रयत्न केला. परंतु ब्राह्मणांनाच फक्त यश आले. क्षत्रियांनी आपली शस्त्रास्त्रे टाकून, ब्राह्मण स्वरूपात येण्याचे कबूल केल्यास यज्ञ त्यांच्याकडे यावयास तयार होता. 'Therefore, now also the ksatriya, as the yajamana, having laid aside his own weapons, with the weapons of the Holy power, with the form of the Holy power ...... goes to the Yajna.[५०]" ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या तडजोडीने यज्ञ या दोन वर्णांपुरताच कसा मर्यादित झाला याचेही ऐतरेय ब्राह्मणामध्ये वर्णन आले आहे.

मूळात यज्ञ हा सर्व समाजाच्या अन्ननिर्मितिप्रीत्यर्थ करावयाचा विधि होता हे ऐतरेय ब्राह्मणातील उताऱ्यावरून स्पष्ट होते. "The yajna as food hath left us" हे उद्गार पुन्हा पुन्हा येतात. यज्ञाचा समाजाच्या अन्ननिर्मितीशी असलेला मंत्रतंत्रात्मक संबंध यावरून स्पष्ट व्हावा. यजुर्वेदाच्या एका शाखेचे नाव 'वाजसनेयी संहिता' असे आहे. 'वाजसनेयी' हा शब्द वाज = अन्न या शब्दापासून तयार झाला आहे. 'अन्नवृद्धि करणारा तो वाजसन.' या संहितेतील मंत्र अन्नवृद्धीप्रीत्यर्थ रचिले आहेत हे यावरून स्पष्ट होते. **'वाजपेय'** यज्ञाचे विवेचन यजुर्वेदातच आहे. **वाज + पेय** या दोन शब्दांनी बनलेला हा विधि अन्नप्राप्त्यर्थच होता हे सांख्यायनावरून[५१] स्पष्ट होते. शतपथब्राह्मणातही 'वाजपेय' शब्दाचे स्पष्टीकरण 'अन्न + पेय' असेच आले आहे.

मूळ यज्ञविधीचे आणखी एक वैशिष्ट्य ध्यानात घेणे आवश्यक आहे. ब्राह्मणग्रंथांमध्ये 'यजमान' शब्दाचा अर्थ पुढीलप्रमाणे दिला आहे : "स्वतःच्या अभ्युदयासाठी यज्ञकर्म **करविणारा** दाता किंवा आश्रयदाता." परंतु हा अर्थ उत्तरकालीन आहे. 'यजमान' शब्दाच्या व्युत्पत्तीमध्ये याला आधार नाही. हा शब्द 'यज' धातूपासून तयार झाला

४७. ऐत. ब्राह्मण १.१८ (कीथच्या भाषांतरावरून)
४८. ऐत. ब्राह्मण ३.४५ (कीथच्या भाषांतरावरून)
४९. ऐत. ब्राह्मण ७.१९ (कीथच्या भाषांतरावरून)
५०. ऐत. ब्राह्मण ७.१९ (कीथच्या भाषांतरावरून)
५१. सांख्यायन १५.१.१










आहे. जेव्हा यज्ञकर्ता आणि फलाचा उपभोक्ता ही व्यक्ति **एकच** असते तेव्हाच हा शब्द उपयोजावा असा या प्रकारच्या शब्दरचनेसंबंधी व्याकरणाचा नियम आहे. पुरोहित आणि यजमान असे वर्ग अद्यापि पडलेले नव्हते. सर्वसामान्य यज्ञकर्ता म्हणजेच यजमान. शिवाय अनेक ऋचांतून 'यजमानाः' असा अनेकवचनी शब्द येतो. या अनेकवचनाचा खुलासा करताना सायणाचार्यांनाही **'यजमानरूप प्रजा'**[५२], असाच अर्थ घ्यावा लागला आहे. यजमान हा यज्ञातील आपला अन्नाचा '**भाग**' घेत आहे असाही उल्लेख काही ऋचांतून आहे. यावरून यजमान म्हणजे पुरोहितांच्या यज्ञकर्माचे आश्रयदाता हा अर्थ ऋग्वेदाच्या उत्तरकालातही पूर्णपणे रूढ झालेला नव्हता. सामूहिक अभ्युदयासाठी– अन्नसंपादनासाठी यज्ञविधी होत असला पाहिजे असे म्हणावयास हरकत नाही. ब्राह्मणकालात यज्ञाचे हे स्वरूप लुप्त होऊन ब्राह्मण क्षत्रियांचा 'स्वर्गकामेष्टी' यज्ञ उदयाला आला. पूर्वीच्या सामूहिक मंत्रांना वर्गीय हितसंबंधांचे रक्षण करणाऱ्या जादू-टोण्याचे (Black-magic) स्वरूप आले. अथर्ववेदातील मंत्र म्हणजे आपल्या शत्रूविरुद्ध वापरावयाची ब्राह्मणांची शस्त्रास्त्रेच होत असे मनूने[५३] सांगितले आहे. अर्थात् मनूने यात नवे काहीच सांगितलेले नाही. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलामध्येच[५४] हा वर्गीय दृष्टीकोन उदयाला आलेला दिसतो. ब्राह्मणग्रंथांच्या काळात त्याला निश्चित स्वरूप प्राप्त होऊन मंत्रतंत्र, यज्ञविधि यांना पूर्णपणे वर्गीय हितसंबंधांचे संरक्षण करणाऱ्या अस्त्रांचे स्वरूप प्राप्त झाले: "A whole class of hymus of Atharva Veda ... ... is concerned only with the interests of the Brahmans, the feeding of priests, the fees for the sacrifice, and such like, and they are, of course, the work of priests."[५५] अशाप्रकारे ब्राह्मणकालात प्राचीन भारतीय जीवनातील 'ऋत' युगाचा शेवट झाला. वैदिक आर्यांच्या या प्राचीन ऋतयुक्त सामूहिक जडवादी जीवनाचा अस्त आणि अध्यात्मवादाचा उदय यांचा विचार पुढील लेखात करू.

---

५२. ऋ. १·१२७.२ वरील सायणभाष्य
५३. मनु ११.३३
५४. ऋ. १०.१०९-४
५५. Winternitz : H. I. L. I. 123-4












श्री. प्र. रा. देशमुख

# ऋग्वेद व आर्यानार्यांचे संघर्ष

( श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांच्या टीकात्मक पत्राची विस्तृत समालोचना श्री. प्र. रा. देशमुख यानी या लेखात केली आहे ).

श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांचे एप्रीलच्या नवभारतातील पत्र वाचले. त्यावरून त्यांच्या डोक्यात वेदाबद्दल काही अत्यंत चुकीच्या वेडगळ, विकृत आणि संपूर्णतः अज्ञानजन्य अशा कल्पना आहेत. त्या त्यांनी वेदाचे पुस्तक कधीही न उघडताच बनविल्या आहेत. त्या इतरांनी खऱ्या मानाव्या असा त्यांचा दुराग्रह आहे. तसे न केल्यास सभ्य माणसाला न शोभेल अशी शिव्या देण्याची तयारी. अज्ञान मुजोरी दुराग्रह, वेडगळपणा, प्रतिपक्षाबद्दल अनादर व असभ्य भाषा याशिवाय या पत्रात काही नाही. हे पत्र म्हणजे वेदाविषयी, कोणत्याही प्रकारची माहिती नसताना आपणाला त्यात काही समजते असे दाखविण्यासाठी आणि त्यासाठी सवंग आणि विकृत देशभक्तीचे प्रदर्शन करणारे म्हणजे पाश्चात्य पंडितांबद्दल अकारण अनुदार उद्‌गार काढणाऱ्या ठोकळेबाज आणि विकृत लिखाणाचा एक नमुना आहे. वास्तविक या पत्रात उत्तर देण्यासारखे काही नाही. परंतु वाचकांचा गैरसमज होऊ नये म्हणून मोठ्या नाखुशीने उत्तर द्यावे लागत आहे.

### पाश्चात्यांच्या भाकडकथा ?

ऋग्वेदाचे आधुनिक प्रथम संशोधन इंग्रजी आणि जर्मन विद्वानांनी केले. ऋग्वेदाची संशोधित प्रत तयार करणे, ऋग्वेदाचे इंग्रजीतून आणि जर्मनीतून भाषांतर करणे, ऋग्वेदाचा शब्दकोश व व्याकरण तयार करणे यासारखी भरीव कामे करून पाश्चात्य विद्वानांनी भारताला कायमचे ऋणी करून ठेवले आहे. 'भारतातील कोऱ्या जमिनीवर त्यानी भरघोस पीक काढले' असे उद्गार चाळीस वर्षापूर्वी प्राच्य परिषदेच्या अध्यक्षांनी काढले. भारतातील ( आधुनिक ) पहिले ज्ञानदीप त्यानीच उजळले. त्याना भाकडकथा रचणारे म्हणणे कृतघ्नतेचा आणि अज्ञानाचा अजब नमुना आहे. कोणत्या पाश्चात्याने कोणत्या पुस्तकात भाकडकथा लिहिल्या हे वऱ्हाडपांडे यांनी सांगितले असते तर बरे झाले असते. वारेमाप सामान्य स्वरूपाचे खोटे विधान करणे अगदी सोपे आहे.

### माझे लिखाण पाश्चात्यांच्या भाकडकथांचा नमुना ?

माझ्या लिखाणाचे वऱ्हाडपांडे यांनी थोडे जरी अवलोकन केले असते तर ते केवळ ऋचांच्या आधाराने लिहिलेले मौलिक स्वरूपाचे लिखाण आहे त्यात दुसऱ्या कोणत्याही पुस्तकाचा आधार घेतला नाही याची वऱ्हाडपांडेना खात्री पटली असती. परंतु काहीही न पाहता आपल्या मूर्ख, वेडगळ आणि हेकेखोर कल्पनांचा प्रतिपक्षावर वृथा आरोप करण्याचा खाक्या असलेल्या वऱ्हाडपांडेना इतकी सुबुद्धी कोठून सुचणार ?

सिंधुसंस्कृतीतील लोक आणि ऋग्वेदात वर्णन असलेले आर्यांचे शत्रू एकच आहेत हे सिंधु उत्खननाच्या माहितीची ऋचातील माहितीशी तुलना करून मी दाखविले आहे. त्यासाठी 'The Indus civiisation in the Rgveda या नावाचे पुस्तक इंग्रजीतून व १५० पांनाचे लिखाण नवभारतातून प्रसिद्ध केले आहे. आज पावेतो भारतात अथवा भारताबाहेर या विषयावर कोणीही लिहिले नाही. हे या विषयावरचे जगातील पहिले लिखाण आहे. ते पूर्णतः मौलिक स्वरूपाचे आहे. त्यासाठी ऋग्वेदाशिवाय अन्य कोणत्याही पुस्तकाचा आधार घेतला नाही. त्यात केलेल्या प्रत्येक विधानावर ऋचांचा आधार आहे. त्यात आर्यांचे आर्यपूर्वांशी संघर्ष, वर्णविद्वेश इत्यादि विषयासंबंधी केवळ ऋचांच्या आधारावरूनच लिहिले आहे. त्यासाठी अन्य कोणत्याही पुस्तकाचा आधार घेतला नाही. त्यात जर वऱ्हाडपांडे यांना पाश्चात्यांच्या 'भाकडकथा' दिसल्या तर तो त्याच्या अगाध अज्ञानाचा व पाश्चात्यांबद्दल वायफळ दुरा-

ग्रहाचा भाग होय. त्यानी असे खोटेनाटे, वेडेवाकडे, आपल्याच दुराग्रहानी भरलेले, लोकावर वृथा आरोप करणारे भाकडकथा वजा ज्यात तर्काला आणि खऱ्या ज्ञानाला मुळीच जागा नाही असे बे-छूट आणि बेरेमाप जे काही अकारण उद्धटपणाने भरकटले ते करण्यापूर्वी माझ्या जुन्या लेखावर नजर फिरवून त्यात मी दिलेले ऋचांचे आधार पाहून घेतले असते तर त्यांचे म्हणणे किती फोल आणि वस्तुस्थितीचा विपर्यास करणारे आहे हे त्यांना कळून चुकले असते. आपल्याला ज्या विषयात कळत नाही त्यात बोलू नये हा व्यवहारातील सामान्य नियम वऱ्हाडपांडे पाळत नसल्यामुळे त्यांच्यावर यापूर्वीही असेच फजितीचे प्रसंग आले.

आता श्री. वऱ्हाडपांडे यांनी उपस्थित केलेल्या मुद्यांचा विचार करून ते किती अज्ञानमूलक, चुकीचे आणि वेडगळ स्वरूपाचे आहेत ते पाहू :

## मुद्दा नं. १

श्री. वऱ्हाडपांडे यांचे म्हणणे असे आहे की—

(अ) इतरांच्या ज्योतिषप्रमाणावरून वेदाचा काल खि. पू. ५००० ते ४००० असल्याबद्दल त्यानी एक लेख लिहिला.

(आ) मी ऐतिहासिक पद्धतीने सिंधुसंस्कृतीचा जो काळ ठरविला आहे तो त्यांच्या कालापेक्षा अलीकडचा आहे. म्हणून माझ्या म्हणण्याचा पायाच ढासळतो.

(इ) मी ज्योतिषविषयक पद्धति कालनिर्णयासाठी प्रमाण मानत नाही हा माझा 'दुराग्रह' होय.

(ई) तो पाश्चात्य पंडितांच्या आर्यांची स्वारी विषयक दुराग्रहातून निर्माण झाला आहे.

त्यांच्या म्हणण्याचे थोडे विश्लेषण करून पाहिले म्हणजे मृच्छकटिकावरील टीकाकार जगद्धराने शकाराच्या भाषणात दाखविलेल्या अर्थशून्यतेचे, तर्कदुष्टतेचे व निष्कारण उद्धटपणाचे सम्यग् दर्शन होते.

श्री. वऱ्हाडपांडेनी उपस्थित केलेला मुद्दा संपूर्णतः अर्थशून्य आहे. श्री. वऱ्हाडपांडे यांनी मला संमत नसलेल्या ज्योतिषप्रमाणावरून जे काय वेडेवाकडे लिहिले ते त्यांचे त्याना लखलाभ असो. त्याने, मी ऐतिहासिक पद्धतीने ठरविलेल्या सिंधुसंस्कृतीच्या कालाचा पाय कसा काय ढासळतो ते एकड्या वऱ्हाडपांडेनाच कळण्यासारखे आहे. विद्वान लोक हल्लीच्या काळी कालगणना ठरविण्यास ऐतिहासिक साधने उपलब्ध असताना ज्योतिषपद्धतीवर का विश्वास ठेवीत नाहीत, त्याची कारणे मी आपल्या लेखात दिली आहेत व मला ज्योतिषविषयक परिमाण मान्य नाही असे स्पष्ट सांगितले आहे. ज्या ज्योतिष पद्धतीच्या आधारे इतरांनी काढलेल्या कालगणनेच्या सारांशावरून वऱ्हाडपांड्यांनी एक लेख लिहिला, तो मान्य नसणे 'दुराग्रह' व हा दुराग्रह आर्यांच्या स्वाऱ्यांच्या दुराग्रहातून निर्माण झाला. सगळाच शकारी मूर्खपणा. जरा व्यवहारातले उदाहरण घेऊ म्हणजे श्री. वऱ्हाडपांडे यांच्या मुद्यातील अर्थशून्यता, तर्कदुष्टता व अकारण उद्धटपणा चटकन ध्यानात येईल. दोन माणसांचा संवाद चालला होता.

पहिला म्हणाला— माझे आजोबा फार ज्ञानी होते, त्यानी आपल्या ज्ञानदृष्टीने सांगितले की त्यांचे वडिलांचे घरी एक १०० फूट उंच तट्टू होते. तू हल्लीचे तट्टू पाहून म्हणतोस की तसे असू शकत नाही. तू फार दुराग्रही आहेस हा दुराग्रह नास्तिकपणातून उत्पन्न झाला. माझ्या आजोबांचे म्हणण्यावरून तुझ्या म्हणण्याचा पायाच नाहीसा होतो.

दुसरा म्हणाला— अरे वेड्या तुझ्या आजोबांच्या ज्ञानदृष्टीवर विश्वास ठेऊन त्यांच्या वडिलांचे येथे १०० फूट उंचीचे तट्टू होते असे पाहिजे तर तू खुशाल समज, त्याला माझी काहीच हरकत नाही. तट्टू इतके उंच असू शकत नाही असे मी म्हणतो. तुझ्या म्हणण्याने माझे म्हणणे कसे गैर शाबित होते तेच मला कळत नाही. हे तुझे म्हणणे मान्य न करणे दुराग्रह कसा आणि नास्तिकपणाचा काय संबंध ?

वऱ्हाडपांडे यांच्या म्हणण्यात आणि पहिल्या माणसाचे म्हणण्यात काडी इतकाही फरक नाही. त्यांचे म्हणणे संपूर्णतः अर्थशून्य, तर्कदुष्ट व फाजील उद्धटपणाचे आहे.

## श्री. वऱ्हाडपांडे यांच्या पहिल्या मुद्यास उत्तर

मी नवभारताच्या फेब्रुवारीच्या अंकात ज्योतिष पद्धति मला का मान्य नाही याची थोडक्यात कारणे दिली आहेत ती वाचकांच्या सोयीसाठी येथे उद्धृत करतो.



अनुक्रमणिका






**ज्योतिषपद्धति —**

"या पद्धतिप्रमाणे अमुक एक नक्षत्र, ऋतु अथवा सूर्यग्रहणासारखी एखादी गोष्ट ऋग्वेदकाली अमक्या वेळी अस्तित्वात होती ती आता अमक्या वेळी अस्तित्वात आहे तो फरक काढून नक्षत्राच्या गति-वरून फरक पडण्यास जितकी वर्षे लागतील तो ऋचा निर्माण झाल्याचा आणि पर्यायाने आर्यांच्या भारता-तील प्रवेशाचा काल ठरतो या कालगणनेच्या बिनचुक-पणाबद्दल खात्री देता येत नाही.

(१) ऋचा काही ज्योतिषविषयक ग्रंथ नाहीत, त्या देवांच्या स्तुति आहेत, त्यात अनुषंगाने आलेले एखादे दुसरे विधान कालगणना करण्याचे दृष्टीने घेणे कितपत श्रेयस्कर होईल हे सांगणे कठीण.

(२) भाषेच्या दुर्बोधपणामुळे अशा विधानाचा अर्थ करण्यात चूक होण्याचा संभव फार आणि थोडीशी जरी चूक झाली तरी गणिताचे उत्तर भलतेच येणे शक्य आहे.

(३) ऋचेतील विधान घेताना ती रचणारास ज्योतिषविषयक पद्धतीने अर्थ लावणारे विद्वान जो अर्थ समजतात तो अर्थ अभिप्रेत होता किंवा नाही हे कळण्याची शक्यता नाही.

(४) ही कालगणना बरोबर आहे अथवा चुकीची आहे ते ताडून पाहण्यास कोणतेही ऐतिहासिक साधन नाही.

(५) ह्या पद्धतीने आलेली कालगणना ऐतिहासिक कालगणनेच्या फार प्राचीन अतएव असंभाव्य वाटते.

प्रस्तुत लेखकाला ज्योतिषविषयक कालगणनेसंबंधी इतकेच म्हणावयाचे आहे की त्यावरून ऋचा निर्मि-तीचा जो काळ येतो तितक्या ऋच्या जुन्या नाहीत. तसे मानल्यास आर्य सिंधुसंस्कृतिपूर्वी अनेक हजार वर्षे भारतात आले असे मानावे लागेल. अशा परिस्थितीत आर्यांनी भारतात प्रवेश केल्यानंतर त्यांचे सिंधु-संस्कृतीतील लोकांशी संघर्ष होऊन त्यांनी त्यांच्या संस्कृतीचा विनाश केला ही ऋचांवरून स्पष्ट दिसणारी गोष्ट अगदी असंभाव्य ठरते. ज्योतिषविषयक काल-गणना ऐतिहासिक सत्याशी विसंगत व विरोधी असल्या-मुळे अस्वीकार्य आहे."

वरील कारणासाठी ज्योतिषविषयक कालगणना मला संमत नसल्याचे मी स्पष्ट लिहिले आहे.

**श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांच्या**
**अज्ञानजन्य दुराग्रही कल्पना**

वरील कारणात मी स्पष्ट केले आहे की आर्य व सिंधु संस्कृतातील लोक यांचे प्रदीर्घ कालपर्यंत संघर्ष होऊन आर्यांनी त्यांच्या संस्कृतीचा विनाश केला ही गोष्ट ऋचातील वर्णनावरून स्पष्ट दिसते. श्री. वऱ्हाड-पांडे यांचे म्हणणे असे आहे की आर्यांच्या आर्यपूर्वावर स्वाऱ्या ही गोष्ट पाश्चात्य विद्वानांच्या डोक्यातून निघालेली कल्पना आहे. संघर्षासंबंधी ऋचात काही नाही आणि पाश्चात्यांच्या "भाकडकथा" मी स्वीकारल्या. श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांना ऋग्वेदाचे थोडेदेखील ज्ञान नाही. त्यानी ऋग्वेद आपल्या आयु-ष्यात कधीही उघडून पाहिला नाही. कदाचित् ऋग्वेद वाचण्याइतके त्यांना संस्कृतचे ज्ञान नसेल. तसे नसेल तर ऋग्वेदासंबंधी त्यानी बोलू नये हा शहाणपणाचा मार्ग. वऱ्हाडपांडे यांनी ऋग्वेद वाचला नसला तरी निदान त्यांनी माझे लेखतरी वाचावयास पाहिजे होते. मी ऋचांच्या आधाराने नवभारत ऑगस्ट व सप्टेंबर १९५८ मध्ये 'आर्यांचे दासांबरोबर' संघर्ष असे दोन लेख लिहिले आहेत त्यात केवळ ऋचांच्या वर्णनावरून हे संघर्ष किती भयानक स्वरूपाचे होते ते दाखविले आहे. कोणत्याही पाश्चात्य लेखकाने ह्याविषयावर विस्ताराने लिहिलेले प्रस्तुत लेखकास माहीत नाही. परंतु त्यानी ऋग्वेदात काय आहे हे समजून घेण्याचा प्रयत्न न करता ठोकून देतो ऐसाजे असे भरमसाट, बेरमाप, कोणताही शहाणा मनुष्य करणार नाही असे, वेडगळ विधान केले आणि त्यात मुजोरी भयंकर. कोण-त्याही प्रकारचे कारण नसता पाश्चात्य विद्वानांना 'भाकडकथा' रचणारे व मला 'दुराग्रही' म्हटले आहे. वास्तविक श्री. वऱ्हाडपांडे यांच्या पत्रात 'भाकडकथा' व फाजील दुराग्रह व उद्धटपणा या-शिवाय दुसरे काहीच नाही.

**मुद्दा नं. २**

वंशकल्पना आधुनिक जननशास्त्राच्या आधारे सिद्ध होत नाही. तेव्हा 'आर्य नावाचा एक वंश कधी काळी अस्तित्वात होता या समजुतीवर आधारलेली

तर्कटे हवेतील किल्ल्यासारखी होत. हे वऱ्हाडपांडे यांचे विधान नुसतेच चुकीचे नाही तर शकारी मूर्खपणाचे एक मासलेदार विधान आहे. श्री. वऱ्हाडपांडे यांना वेद माहीत नाहीत हे क्षम्य आहे परंतु एथ्नालॉजीचे थोडेही ज्ञान नसता त्यासंबधीही भलतेच चुकीचे विधान करताना लोक आपणाला काय म्हणतील याचा थोडाही विचार त्यानी केला नाही. आधुनिक भारतातील जे एथ्नीक टाइप्स आहेत त्यात nordic म्हणजे आर्य हा एक आहे. ही सामान्य ज्ञानाची गोष्ट वऱ्हाडपांडे यांना माहीत नाही. भलतेच चुकीचे आणि अज्ञानमूलक विधान करून वर लोकाचे म्हणणे हवेतील किल्यासारखे आहे असे म्हणण्याचा बालिशपणा. श्री. वऱ्हाडपांडे यांनी माझा जानेवारी नवभारत १९५९ मधील लेख वाचावा म्हणजे त्याना भारतातील एथ्नीक टाईप्सचे ज्ञान होईल.

## मुद्दा नं. ३

तिसरा मुद्दा वेदवाङ्मयात ' आर्य ' हा शब्द वंशवाचक म्हणून येत नाही. जणू काय श्री. वऱ्हाडपांडे यांनी सम्यग् वेदाचे अध्ययन केले आहे या तोऱ्यात हा चुकीचा मुद्दा निर्माण केला आहे· श्री. वऱ्हाडपांडे यांचे म्हणणे खोटे आणि वेडगळपणाचे आहे. ज्या माणसाने वेद कधीच उघडून पाहिले नाही. त्याने त्यात अमुक आहे आणि अमुक नाहीत हे म्हणण्यासारखे अविचारी धाष्टर्य दुसरे नाही. माझ्या नवभारत एप्रिल १९६३ मधील लेखात मी या प्रश्नाचा विचार केला आहे तो वऱ्हाडपांडे यानी पाहावा म्हणजे त्यांचे विधान किती चुकीचे आहे ते त्याना कळेल. वाचकांच्या सोयीसाठी तो येथे दिला आहे. " मानववंश याअर्थी जेव्हा वर्ण शब्दाचा उपयोग केला तेव्हा तो दास निदर्शक दासवर्णम् व आर्य निदर्शक आर्यवर्णम् असा दास आणि आर्य असे दोन भिन्न मानवसमाज दाखविण्यासाठीच केला आहे. 'दासवर्णम्' आणि 'आर्यवर्णम्' हे शब्द ज्या दोन ऋचातून आले आहेत त्याच्या संबंधित भागाचा अर्थ असा (**योदासवर्णमधरं गुहाकः** । २-१२-४ ) ज्याने दासाना गुप्तस्थानी जावयास लावले-ऋचा ३-३४-९ मध्ये आर्यवर्णम् हा आर्य दर्शक मानवजाती वाचक शब्द आला आहे. ही ऋचा काहीशी महत्वाची असल्यामुळे ऋचेचा पूर्ण अर्थ दिला आहे ' ससानात्याँ उतसूर्यं ससानेन्द्रः ससान पुरुभोजनं गाम् । हिरण्यमुत भोगं ससान हत्वा दस्यून्प्रार्यं वर्णमावत् ॥ ३-३४-९ अर्थ- इन्द्राने, दस्यूना मारून घोडे दिले, सूर्य दिला, पुष्कळ दूध देणाऱ्या गायी दिल्या, सोने आणि इतर उपभोग्य वस्तू दिल्या आणि **आर्यवंशाचे** रक्षण केले. " वरील ऋचावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते ती ही की सुरवातीला आर्य वर्णम् व दासवर्णम् असे दोन भिन्न मानववंश होते.

आर्य आणि दास यातील भिन्नत्वदर्शक ऋचात काही नाही हेही श्री. वऱ्हाडपांडे यांचे म्हणणे तितकेच खोटे आणि चुकीचे आहे. मी Indus civilisation in the Rgveda आणि नवभारतातील १५० पानात त्याच्यातील भेद व दासांचे आणि सिंधुसंस्कृतीतील लोकाचे ऐक्य दाखविले आहे. ते श्री. वऱ्हाडपांडे यांनी पाहिल्यास त्यांच्या सर्व वेडगळ कल्पना हवेतील किल्यासारख्या नाहीशा होतील त्यांच्या रंगरूपाबद्दल नवभारत १९५९ मध्ये लिहिले ते वाचावे.

## मुद्दा नं. ४

हाही मुद्दा वेडगळ तर्कटाचा अजब नमुना आहे. म. म. पां. वा. काणे यानी सिंधुसंस्कृति आर्यांची आहे असे विधान केले त्याना उत्तर दिले आहे.

त्यावेळी आर्य भारतात नव्हते असे माझे बिलकूल म्हणणे नाही ही श्री. वऱ्हाडपांडे यांच्या डोक्यातील वेडगळ आणि चुकीची कल्पना आहे. आर्य त्याकाळी भारतात नव्हते असे माझे बिलकुल म्हणणे नाही. काहीतरी वेडगळ आणि मूर्खपणाची विधाने दुसऱ्याच्या माथी मारण्याची वऱ्हाडपांडे याची शकल अजब आहे. माझ्या लेखाचा संबंधित उतारा खाली दिला आहे त्यावरून वऱ्हाडपांडे यांचे म्हणणे संपूर्णतः खोटे आहे हे वाचकांच्या ध्यानात येईल. " वरील मृतशरीरांच्या वर्गीकरणावरून काही अत्यंत महत्त्वाची अनुमाने निघतात त्यांचा विचार करणे प्रस्तुत आहे. हरप्पा आणि मोहेंजोदारोतील लोक आर्य असावे असे मत म. म. पां. वा. काणे यानी आपल्या वाल्टेअर इतिहास कॉंग्रेसच्या अध्यक्षीय भाषणातून व्यक्त केले आहे. हराप्पा आणि मोहेंजोदारो जर आर्यांच्या वसाहती असतील आणि तेथील बहुसंख्य लोक जर आर्य असते तर तेथे आढळलेल्या मृत शरीरांपैकी बहुसंख्य मृतशरीरे आर्यांची

सापडली असती. आर्यांच्या शीर्षकांच्या संपूर्ण अभावावरून हरप्पा आणि मोहेंजोदारो येथील लोक आर्य नव्हते हीच गोष्ट प्रामुख्याने सिद्ध होते. " मुद्दा नं ४ ही वऱ्हाडपांडे यांची कपोलकल्पना आहे दिसून येईल.

## मुद्दा नं. ५

ऋचातील शहरे रूपकवजा आहेत ती खरीखुरी शहरे नव्हती हे वऱ्हाडपांडे यांचे म्हणणे चुकीचे आहे ते ऋग्वेदातील ऋचांच्या माहितीच्या संपूर्ण विरुद्ध आहे. हरियुपिया (हरप्पा), अंशुमति, दुर्योण इत्यादि शहरांचा उल्लेख ऋचातून आहे. सहाव्या मंडळातील २७वे सूक्त 'हरियूपिया' शहरांच्या विनाशाबद्दल आहे. त्यात अभ्यवर्ती चायमानाने वेढा घालून त्या शहरांचा विनाश केला हे आहे. नवभारत १९५६ सप्टेंबर मधील 'सिंधु उत्खननातील शहरे व ऋग्वेदातील पुरे' हा लेख वाचावा म्हणजे वऱ्हाडपांडे यांच्या चुकीच्या कल्पना नाहीशा होतील. इंद्र हा मनुष्य होता व त्याने शहरे फोडली असे मूर्खपणाचे विधान मी कोठेही केले नाही.

## मुद्दा नं. ६

श्री. वऱ्हाडपांडे यांच्या ६ व्या मुद्यातले म्हणणे अगदी चुकीचे आहे. आर्यांचे व आर्यपूर्वांचे संघर्ष झाले एवढ्यावरूनच ते भिन्न मानवसमाजाचे होते असे कोणाचेच म्हणणे नाही. ते भिन्न मानववंशाचे होते हे सिद्ध केले आहे. त्या दोघांचे, रंग, रूप, स्वभाव, रचना उद्योग धंदे, चालीरीती देवधर्म, पूजापद्धति, समाज-रचना इत्यादी सर्वच गोष्टी एकमेकांपासून पूर्णपणे भिन्न होत्या. आर्यांचे सर्व प्रयत्न आर्यपूर्वांचा समाज कायमचा नाहीसा करण्याचा, त्यांची शहरे जाळणे, त्यांच्या फार मोठ्या प्रमाणावर कत्तली करणे. त्यांचे बी शिल्लक उरू नये म्हणून त्यांच्या गर्भवती स्त्रियांच्या कत्तली करणे, ऋचातून ते वेगळया मानववंशांचे होते असा उल्लेख एकांचे देव इंद्र, अग्नी, मरुत् अश्विनौ, उषस्, वरुण इत्यादि यज्ञ ही पूजापद्धति सोमाने व हविर्द्रव्याने देवाची पूजा करणे. दुसरे लिंग व मूर्तिपुजक ज्याना यज्ञाचे अगदीच वावडे व ज्यांच्या पूजापद्धति अगदीच निराळया. आर्य आपल्या शत्रूंना काळया रंगाचे, दास, दस्यू, पणि, यज्ञ न करणारे इत्यादि नावाने संबोधीत. पणींच्या चालीरीती आर्यांपेक्षा अगदीच भिन्न ते डोक्यावर शिंगे धारण करीत, वृषभाची पूजा करून जिभेला चिरा देत, प्रस्तुत लेखकाने ऋचांच्या साह्याने आर्य आणि आर्यपूर्वांचे भेद दाखवून दिले आहेत. समग्र लिखाणाची पुनरावृत्ति करणे शक्य नाही. श्री वऱ्हाडपांडे यांनी माझ्या लिखाणाचे पानही न उघडता ही भरमसाट टीका केली आहे.

## मुद्दा. नं. ७

याचा माझ्या लिखाणाशी बिलकूल संबंध नाही. आर्यांच्या भाषेतून युरोपीय भाषा निघाल्या हे मी कोठेही म्हटले नाही. माझ्यामते त्या प्राकृत भाषेतून निघाल्या व प्राकृत ही आर्यपूर्वांची भाषा होती.

## मुद्दा नं. ८

वऱ्हाडपांडे यांचे सामान्य भाषेचे अगाध अज्ञान या मुद्यातून दृष्टीस पडते. त्यानी जे अवतरण दिले आहे ते सुधांशु रे यांचे असूच शकत नाही, ते एखाद्या सामान्य विद्वानाचेही असू शकत नाही. ते अत्यंत मूर्खपणाचे आहे. संस्कृत आणि '**पाली**' भाषेतून बंगाली तामीळ, हिन्दी, गुजराती या भाषा निघाल्या असाव्या. "संस्कृतपासून अथवा पालीपासून तामीळ भाषा निघाली असे वऱ्हाडपांडे सोडून दुसरा कोणीही मनुष्य म्हणू शकणार नाही. चुकीचे तर्कट सिद्ध करण्यासाठी एका थोर व्यक्तीच्या माथी भलतेच विधान चिकटवणे यासारखे धाष्टर्य दुसरा कोणीही करू शकणार नाही.

## मुद्दा नं. ९

आर्य भारतात आल्यानंतर अनेक शतकांनी ऋग्वेदात संकलित केलेल्या ऋचांची रचना झाली हे प्रस्तुत लेखकाने आपल्या लेखातून दाखवून दिले. त्यापूर्वी पूर्व आर्यांनी आर्य पूर्वांशी युद्ध करून त्यांच्या कत्तली उडविल्या; त्यांच्या शहरांच्या संस्कृतीचा विनाश केला. या संघर्षाची वर्णने ऋचातील पहिल्या मंडळापासून दशम मंडळापावेतो आहेत. ऋचा निर्मितीच्या वेळी आर्य भारतासच आपला देश मानीत होते त्यामुळे आर्य जेथून आले तेथील वर्णने ऋचातून येणे शक्य नाही परंतु दुसऱ्या इतक्या गोष्टी आहेत की आर्य आणि दास हे परस्परापासून भिन्न होते हे स्पष्ट दिसते.

आर्य भारतास आपला देश मानीत असले तरी प्राचीन वाङ्मयातील 'ऋषि' सारखे देशवाचक

शब्द ऋचातून आढळतात हे प्रस्तुत लेखकाने मे १९६२ च्या नवभारताच्या ' सिंधु संस्कृतीतील लोकच वेदातील आर्यांचे शत्रू : ९ : या लेखात दाखविले आहे.

## भारतीय ज्ञानाचे शत्रू

भारतीय ज्ञानाचे खरे खरे शत्रू ज्याना शास्त्रीय ज्ञान नाही परंतु त्या संबंधी चुकीच्या भरमसाट दुराग्रही कल्पना, भाकडकथा व उद्धटपणा, लोक आपणास काय म्हणतील याची बिलकुल खंत नसलेले दुराग्रही लोक. त्याना वेदाबद्दल अधिकारवाणीने बोलण्यासाठी वेद उघडून पाहण्याची जरूरी नाही. वेद वाचणे, त्यातील सर्व शब्दांचा अर्थ समजून घेणे, वेदाचे व्याकरण समजून घेणे इत्यादि कशाचीही जरूरी नसते. ते त्यांच्या दुराग्रहाने ठरविलेल्या वाटेल त्या चुकीच्या गोष्टी ठोकून देतात. त्याना काहीच अर्थ नसतो. त्यांचे भांडवल म्हणजे पाश्चात्य विद्वानांना अकारण दोष देऊन सवंग देशभक्तीचे प्रदर्शन करून भारतीय वाचकाची सहानुभूती आपल्याकडे ओढून घेण्याचा प्रयत्न करणे, प्रतिस्पर्धी पाश्चात्यांच्या लिखाणाच्या आधाराने लिहितो असे खोटेच भासविणे, प्रत्येक मूर्खपणाच्या विधानाला नंबर देऊन आपण काही नवा मुद्दा उत्पन्न केला असे दाखविणे व प्रत्येक वेळी प्रतिस्पर्ध्यांच्या तर्कटाचा पायाच नाहीसा होतो, त्याची तर्कटे हवेतील किल्ल्यासारखी आहेत वगैरे एखाद्या वात्रट मुलासारखे वारंवार म्हणणे हे होय. यामुळे खऱ्या ज्ञानाच्या प्रसारास अडथळा येऊन वेडावाकडा मूर्खपणा मात्र पसरतो. हे लोक भारतीय ज्ञानाचे खरे शत्रू होत हे वाचकांनी जाणून घेणे अत्यंत आवश्यक आहे.

## विद्वानांची प्रतिक्रिया

प्रस्तुत लेखकाच्या लिखाणाबद्दल प्रथमश्रेणीच्या भारतीय व पाश्चात्य विद्वानांची काय प्रतिक्रिया आहे ते प्रस्तुत लेखकाने मार्च १९६४ मधील नवभारतातील ' आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना (उत्तरार्ध) ' या लेखात दाखविले आहे. त्या संबंधी दिवंगत विद्वान ज्योतिषविषारद, करण ग्रंथाचे कर्ते, ज्यांचे ज्योतिषविषयक ग्रंथ छापून व ज्यांना डि. लिट्ची उपधा देऊन नागपूर युनिव्हर्सिटीने ज्यांच्या ज्योतिषविषयक विद्वत्तेचा गौरव केला त्या श्री. ल. के. ऊर्फ भाऊजी दप्तरी यांचे प्रस्तुत लेखकाच्या लिखाणासंबंधी काय मत आहे ते त्यांच्याच शब्दात देणे अवश्य वाटल्यावरून येथे उद्धृत केले आहे.

" Many thanks for your book ' The Indus civilisation in the Rgveda' you have no doubt made a useful contribution to the oriental learning. Your conclusions very mnch approach mine. According to me, the Vedas were composed when Aryans established a state in ब्रह्मावर्त i. e. the country between सरस्वती and दृशद्वती. This state was established in 3102 B. E. The fight between the Aryans and the people of Mohenjodare must have preceded that date. "

Your Sincerely
K. L. Daftari

गेल्या जानेवारीत नवी दिल्ली येथे झालेल्या २६ व्या विश्वप्राच्य परिषदेत प्रस्तुत लेखकाने ' Indus civilisation & Rgveda ' या विषयावर वेदिक सेक्शन नं. ६ मध्ये लेख लिहिला होता. त्या सेक्शनचे अध्यक्ष प्रो. थिमी नावाचे जर्मन गृहस्थ होते. एका निबंधाला साधारणतः १५ ते २० मिनिटे वेळ मिळत होता. माझा निबंध ११ टाइप्ड शीटस् असल्यामुळे वाचावयाला ४५ मिनिटे लागली. त्यानंतर त्यावर एक तासभर उद्बोधक चर्चा झाली. शेवटी अध्यक्षानी ' Gental man your paper invoked such lively discussion I must specially thank you म्हणून स्पेशल आभार मानले अशा प्रकारचे स्पेशल आभार फक्त याच निबंधाचे मानले गेले.








## वाचकांचा पत्रव्यवहार —

संपादक, ‘ नवभारत ’

सप्रेम नमस्कार वि. वि.

‘ नवभारत’च्या मे ६४ च्या अंकातील श्री. चांदोरकरांचा लेख आणि त्यावरचे जुलै ६४ च्या अंकात प्रसिद्ध झालेले डॉ. कर्णिकांचे पत्र वाचले. श्री. चांदोरकरांचा लेख वाचल्यानंतर त्यासंबंधी पत्र लिहिण्याचा मनांत विचार आला होता. पण चांदोरकरांनी केलेली पुराणकथा आणि शास्त्रीय सत्य यांची भेसळ इतकी उघड होती की तिचे बनावट स्वरूप मुद्दाम उघड करून दाखविण्याची जरूरी आहे असे मला वाटले नाही. तथापि लिंगपरिवर्तनाच्या बाबतीत आधुनिक शास्त्रीय ज्ञानाची स्थिती काय आहे हे स्पष्ट करण्याची जरूरी होतीच. हे काम डॉ. कर्णिकांनी केल्याबद्दल धन्यवाद ! ( मात्र त्यानी यापेक्षा अधिक तपशीलाने हा प्रश्न चर्चावयास पाहिजे होता. त्याऐवजी त्यानी ब्रह्मदेवाच्या अश्रूतून जांबवान जन्मले किंवा हनुमंताच्या घामातून मकरध्वज जन्मला यासारख्या उघड उघड दंतकथा खोडण्यामध्ये विनाकारण वेळ घालविला आहे. अशा विलक्षण प्रजोत्पादनावर वाचक विश्वास ठेवतील असे कर्णिकांना वाटते काय ? हीच गोष्ट ब्रह्मचाऱ्याच्या “ प्रकाशणाऱ्या ” वीर्याची ) पण त्यांचे पत्र वाचल्यानंतर त्यातील एक विधान शास्त्रीय दृष्ट्या काटेकोरपणाने केलेले नाही असे आढळून आले. आणि म्हणून हे पत्र लिहीत आहे.

समागमानंतर आपल्याला गर्भधारणा झाल्याचे स्त्रीला तत्काळ कळते आणि याची खूण म्हणजे तिची संभोगतृप्ति होय हे चांदोरकरांचे विधान डॉ. कर्णिकांनी खोडून काढले ते योग्यच केले. संभोगतृप्तीशिवायसुद्धा गर्भधारणा होऊ शकते हे खरे आहे. पण “ गर्भसंभवाचा आणि संभोगतृप्तीचा अन्योन्य संबंध नाही... या दोन्ही क्रिया वेगळया आहेत. ” हे डॉ. कर्णिकांचे विधान निखालस सत्य म्हणून स्वीकारता येत नाही. संभोगतृप्तीशिवाय गर्भधारणा होऊ शकते यावरून संभोगतृप्तीचा आणि गर्भधारणेचा अन्योन्य संबंध नाही असा निष्कर्ष काढता येत नाही. याच्या विरुद्ध पुरावा नसता तरी असा निष्कर्ष काढता आला नसता. पण बराच अप्रत्यक्ष पुरावा आहे. काही सस्तन प्राण्यांवरील प्रयोगावरून असे आढळून आले आहे की समागमक्रियेमध्ये मादीच्या जननेंद्रियामध्ये निर्माण होणारे जोराचे उद्दीपन – स्नायूंची हालचाल– स्त्रीबीजकोशातील स्त्रीबीज ( Ovum ) मुक्त करण्यास समर्थ असते. हे सुटे झालेले बीज संभोगक्रियेत योनीत पडलेल्या पुंबीजाशी थोड्याच अवधीत संयोग पावते व गर्भधारणा होते. केंब्रिजच्या प्रा. हॅमंड यांना सशावरील प्रयोगामध्ये हे स्त्रीबीजाचे बीजकोशातून होणारे विमोचन ( Ovulation ) संभोगक्रियेनंतर केवळ दहा तासात घडून येत असल्याचे आढळून आले. मांजरासारख्या काही प्राण्यात अशाप्रकारची गर्भधारणा नेहमीच घडून येते. अमेरिकेतील स्त्रीवंध्यत्वतज्ञांच्या मते लैंगिक जीवनाशी पुरते जुळते न घेतलेल्या स्त्रियांच्या बाबतीत काही प्रसंगी असे घडून येण्याची शक्यता असते. संभोगामध्ये स्त्रीने लैंगिक उच्चांक ( Orgasm ) गाठला तर तिच्या अंतर्जननेंद्रियाचे जे जोराचे उद्दीपन होते त्याचा परिणाम क्वचित् स्त्रीबीजविमोचनामध्ये होणे शक्य आहे. याचा एक पुरावा पुढीलप्रमाणे देता येईल. बहुसंख्य स्त्रियांमध्ये त्यांच्या मासिक चक्राच्या विशिष्ट अवधीत संभोग केला असता गर्भधारणा होत नाही असे आढळून आले आहे. ( संततिनियोजनासाठी याची ‘ सुरक्षित ’ काल म्हणून शिफारस केली जाते. ) पण याला अपवाद असून मासिक पाळीच्या– म्हणजे रक्त वाहत असताना– केलेल्या संभोगानेसुद्धा क्वचित् गर्भधारणा झाल्याची उदाहरणे आहेत. अशा अनियमित काळी होणारी गर्भधारणा त्या काळच्या संभोगाने होणाऱ्या स्त्रीबीजविमोचनानेच शक्य आहे हे उघड आहे.











स्त्रीला संभोग अत्यंत सुखकारक झाला, म्हणजे तिच्या बाह्य व अंतर्जननेंद्रियांचे अति उद्दीपन घडून आले, तर एका महिन्यात अशाप्रकारे दोन-तीन वेळासुध्दा स्त्रीबीजविमोचन होणे शक्य आहे असे काहींचे मत आहे. अशा स्त्रीबीजविमोचनाने म्हणजे अत्यंत सुखकारक संभोगाने- मासिक चक्राच्या कोणत्याही कालावधीत गर्भधारणा होईल हे उघड आहे. अशा रीतीने स्त्रियांच्या बाबतीतील हे निरीक्षण (आणि हे निरीक्षण अलीकडचे नसून व्हॅन डी व्हेल्डेसारख्या विख्यात डॉक्टरने बऱ्याच वर्षापूर्वी लिहून ठेवले आहे.) आणि प्राण्यांवरील काही प्रयोग लक्षात घेता संभोगतृप्तीचा आणि गर्भधारणेचा अन्योन्य संबंध नाही, या दोन्ही क्रिया वेगळ्या आहेत असे निश्चित विधान करता येत नाही- निदान असे विधान करण्याइतके आपले ज्ञान परिपूर्ण नाही हे स्पष्ट होईल. मात्र "समागमानंतर आपल्याला गर्भधारणा झाल्याचे स्त्रीस तत्काळ समजते!" (मग त्याची खूण काहीही असो.) हे चांदोरकरांचे विधान चुकीचे आहे हे डॉ. कर्णिकांचे म्हणणे बरोबर आहे.

—अद्वयानंद गळतगे

### श्री. ना. गो. चापेकरांचे 'व्यासोच्छिष्टम्'

जून १९६४च्या नवभारताच्या अंकात नानासाहेब चापेकरांनी 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्' ह्या शीर्षकाखाली एक लेख लिहिला आहे. त्यातील काही तर्कदुष्ट विधाने आम्ही पुढील लेखात दाखवितो :

नानासाहेबांनी एक विचित्र प्रश्न विचारला आहे— तो असा की कुंतीने मंत्र जपताच पाच पुत्र एकदम तिच्यापुढे का उभे राहू नयेत ? याचे उत्तर—मंत्राने पुत्रोत्पत्ति याचा अर्थ पतिपत्नीच्या ठिकाणी पुत्रोत्पादनाची शक्ति नसते ती मंत्राने येते व नंतर पुत्रोत्पत्ति नेहमीच्या निसर्गक्रमानेच होते. कर्णोत्पत्तीच्या वेळी सूर्य 'संबभूह तयासह' असे शब्द आहेत. धर्मजन्माच्या पूर्वी 'संयुक्ता साहि धर्मेण' म्हणजे यमधर्माने तिच्याशी संभोग केला असे शब्द आहेत. भीम वायूपासून 'जज्ञे' जन्मला असा शब्द आहे. अर्जुनाच्या अगोदर कुंती व पांडु यानी व्रत व तप एक वर्षभर केले असे वर्णन केलेले आहे. माद्रीने मनाने अश्विनीपुत्रांचे ध्यान केले व नंतर 'तावगम्य सुतौ तस्यां जनयामासतुर्यमौ, म्ह० जुळे अश्विनीकुमार येऊन तिच्या ठिकाणी पुत्र उत्पन्न करते झाले. ( चित्रशाळा प्रत आदिप० अ. १२३—१२४ ). हा सगळा संदर्भ, लिहिण्याच्या अगोदर न पहाताच नानासाहेबानी कुंतीला एकदम पाच पुत्र का झाले नाहीत असा विचित्र प्रश्न विचारला आहे.

मंत्राने किंवा वरदानाने पुत्रोत्पत्ति ताबडतोब झालीच पाहिजे असा सिद्धांत नाही. याचे उदाहरण राम व त्याचे बंधु यांच्या जन्माचे आहे. यज्ञात प्राजापत्य वराने दशरथाला पायस दिले. त्याचे भाग करून दशरथाने आपल्या तीन राण्यांना दिले. काही काळाने त्याना गर्भधारणा झाली. पायस भक्षणापासून बाराव्या महिन्यात पुत्र झाले. राम पुनर्वसु नक्षत्रावर जन्मला, भरत पुष्य नक्षत्रावर आणि लक्ष्मण शत्रुघ्न, आश्लेषा नक्षत्रावर जन्मले. तात्पर्य मंत्र व वरदान, मातापित्यांची अपत्य उत्पादनाची शक्ति पूर्ण करतात व अपत्ये सृष्टिक्रमाने होतात. तेव्हा कुंतीला एकदम पुत्र का झाले नाहीत हा नानासाहेबांचा प्रश्न तर्कदृष्ट्या चूक आहे.

कुंतीला पुत्र सामान्य पुरुषापासूनच झाले असे नानासाहेब म्हणतात ते खरेच आहे. तरी वरचा प्रश्न ते विचारतात. वस्तुतः नियोगपद्धति त्या काळाच्या सुमारास हीन गणली जाऊ लागली होती. तेव्हा पांडवाचा हीनपणा झाकण्यासाठी मंत्रप्रभावाने देवांपासून त्यांची उत्पत्ति झाली असा अद्भुताचा आश्रय घेतलेला आहे. कौरवांचा जन्मतः हीनपणा दाखविण्यासाठी, कसे वर्णन केले आहे ते पहा. गांधारीच्या पोटात गर्भाचे सल बारा महिने

राहिले. तिने कुंतीच्या ईर्ष्येने दगडाने पोट बडविले तेव्हा ती एक मांसपेशी (गोळा) प्रसवली. तिच्यावर पाणी शिंपताच ती पेशी फुटली. तिचे शंभर तुकडे व्यासानी तुपाने भरलेल्या शंभर घटात ठेवले व कौरव जन्मले. कौरवांचा जन्मतः हीनपणा दाखविण्यासाठी त्यांची उत्पत्ति अनैसर्गिक हीनपणाने झाल्याचे दाखविले आहे. तात्पर्य पुराणग्रंथ अद्भुताचा आश्रय करून चांगुलपणा व हीनपणा दाखवतात. अद्भुताचा भाग काढून आपल्याला सरळ नैसर्गिक रीत पुष्कळदा दाखविता येते.

तर्कदोषाचे दुसरे उदाहरण, त्याच अंकाच्या ३२ व्या पृष्ठावर आहे. 'पांडव कौरव यांच्या नात्याचा विचार करता पांडव हे सोमवंशी म्हणजे चांद्रमान मानणारे व कौरव हे सूर्यवंशी होते. पांडव अज्ञात वासातून प्रकट झाले तेव्हा योग्य कालाचा वाद ह्या उभय पक्षात उद्भवला होता हे सर्वश्रुतच आहे असे नानासाहेब म्हणतात.

उत्तरगोग्रहणाचा वाद पांडव व कौरव यांच्यामध्ये त्यावेळी झालेला नाही. अर्जुन दिसल्याबरोबर दुर्योधनाने भीष्माजवळ आक्षेप घेतला. पांडवांनी चांद्रमानाने अज्ञातवास पुरा केला असे समाधान भीष्मानी केले. वस्तुतः दोघांचे वर्षमान भिन्न असते तर द्यूताच्या वेळेसच शकुनीने वनवास सौर मानाने करावयाचा अशी अट घातली असती. तेव्हा पांडवांनी चांद्रमानाने अज्ञातवास पुरा केला. कारण त्यानी कमी अवधीचा फायदा घेतला यावरून दुर्योधन सूर्यमान मानणारा म्हणून सूर्यवंशी हे अनुमान सिद्ध होत नाही.

कुरु, कौरव, कौरव्य ह्या संज्ञा कौरवांना व पांडवांना दोघांनाही लावल्या आहेत.

विस्तरं कुरुवंशस्य, गांधार्या धर्मशीलताम्
क्षत्तुः प्रज्ञां धृतिं कुन्त्याः (आदि० अ० १ श्लो० २०) येथे गांधारी व कुन्ती ह्या दोघी कुरु वंशातल्या असा उल्लेख आहे.

एतान् प्रमथ्य संग्रामे प्रियार्थं तव कौरव
(द्रो०अ० ८७ श्लो० २६ व्हलगेटप्रत)

येथे सात्यकि धर्मराजाला 'कौरव' म्हणतो. अशी आणखी पुष्कळ उदाहरणे आहेत. तेव्हा कौरव व पांडव एकाच कुरुवंशातले होते. म्हणून दुर्योधन सूर्यवंशातला होता हे नानासाहेबांचे अनुमान चुकीचे आहे.

नानासाहेबांच्या ह्या लेखात असेच आणखी काही अपसिद्धांत मांडले आहेत. पण विस्तारभयास्तव ते आम्ही खोडीत नाही.

— वि. ह. निजसुरे



अनुक्रमणिका

## पुस्तक परिचय —

**" जा माझ्या माहेरा "** संपादिका डॉ. सरोजिनी बाबर, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य माला पुष्प ८ वे, किं. ३–५०

डॉ. सरोजिनी बाबर यांच्या संपादनत्वाखाली 'महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती'च्या वतीने 'जा माझ्या माहेरा' हे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. गेल्या १५/२० वर्षात लोकसाहित्यातील स्त्री-गीतांचे प्रकाशन अनेक मान्यवर संपादकांच्या प्रयत्नांमुळे विपुल प्रमाणात झाले आहे व वाचकांकडून, टीकाकारांच्या कडून त्यांच्या प्रयत्नाचे व लोककाव्यातील साध्या, सुबोध काव्यरचनेचे बरेच कौतुकही झाले आहे. साधारणपणे अशा पुस्तकातील लेखांचे स्वरूपही ठरून गेलेले असते. काही ओव्यांच्या भावपूर्ण आशयाची लेखक गद्यात गुंफणी करतात आणि साध्या भोळ्या मनाच्या भावनेचे व क्वचित् कल्पकतेचे कौतुक करण्यातच लेख संपुष्टात येतो. काही हेतूने संयोजन केल्याचा किंवा सखोल संशोधन करून काव्यशास्त्रीय वा समाजशास्त्रीय चिकित्सा केल्याचा अगदी एखादाच अपवाद या क्षेत्रात आढळेल.

सासर–माहेर विषयक लोकसाहित्याचे एकत्रीकरण करण्याच्या हेतूने डॉ. बाबर प्रथमतः प्रेरित झाल्या आहेत आणि नंतर त्यात उखाणे, रांगोळ्या, म्हणी, वाक्प्रचार व इतर अनेक विषयावरील गाणी त्यांनी एकत्रित केली आहेत. अर्थातच पुस्तकाची रचना बरीच अस्ताव्यस्त होऊन गेलेली आहे. त्याचप्रमाणे पुस्तकाच्या प्रस्तावनेत 'आलेल्या साहित्यातून आपण निवड केली' असे जरी त्यांनी म्हटलेले असले तरी ती निवड फारच सैलपणाने केलेली स्पष्ट जाणवते. लोकसाहित्याकडे पाहण्याची हळवी, विवशवृत्ति या सैलपणाच्या मुळाशी आहे. भल्या मोठ्या आकारातील ५५० पृष्ठांचा हा ग्रंथराज नुसताच अगडबंब झाला आहे असे त्यामुळेच वाटते. उत्तम बांधणी, उत्तम कागद, उत्तम छपाई व चित्रे असलेल्या या ग्रंथाची किंमत सरकारने बहुजनांसाठी फक्त साडे तीन रुपये ठेवलेली आहे ही अभिनंदनीय गोष्ट असली तरी ज्या पुस्तकावर कित्येक हजार रुपये सरकारने खर्च केले असतील त्या पुस्तकाचे अंतरंग असे सामान्यच असावे याची हळहळ वाटल्याखेरीच राहात नाही. अशा परिस्थितीत एखाद्या दुसऱ्या लेखाचाच तो काहीसा अपवादात्मक असल्याने उल्लेख करून परीक्षण करावे असे वाटते. तेवढेच हाती लागते.

पुस्तकाच्या पहिल्या भागात 'ऋणानुबंध' या शीर्षकाखाली स्वतः डॉ. बाबर यांनी सासर-माहेर विषयक एक लेख लिहिलेला आहे. आजकाल बालपणी विवाह होत नसल्याने सासर-माहेरा विषयींच्या भावनात-अनेक बदल झालेले आहेत याची पुसटती जाणीव त्यात व्यक्त झालेली आहे तरीही सासर-माहेर बद्दलच्या जुन्याच भावना आता स्थायिभावासारख्या होऊन बसल्या आहेत असेच त्याना वाटते. म्हणून सासरचा जाच, लग्न समारंभातील रूढी व सोहळ्याचा आनंद याची चित्रे त्यांनी सविस्तर काढलेली आहेत. "बहिणीला भाऊ म्हणजे विसाव्याचे झाड. लेकीला आईवडील म्हणजे तीर्थाचे सागर. नणंदेला भावजय म्हणजे दैवाची लक्ष्मी..." अशी विधाने भारावून टाकणारी असली तरी थोड्या अवधीतच त्यातील ढोबळपणा ध्यानात येतो. विविधवेळी घेतल्या जाणाऱ्या उखाण्यातून लोकपरिस्थितीचे ज्ञान होते अशा अर्थाची विधानेही समाजशास्त्रीय वा सौंदर्यदृष्टी खोलवर न नेल्याने निरुपयोगी ठरतात. ह्याचप्रमाणे या पहिल्या भागातील सर्वच, म्हणजे पंधरा लेखांचे पुष्कळसे स्वरूप आहे. वास्तविक पाहता या विभागात लिहिणाऱ्या लेखकांनी विदर्भ–मराठवाडा अशा वेगवेगळ्या विभागातील लोकगीते उदाहरणादाखल घेतलेली आहेत. तेव्हा संपादकांना तौलनिक भूमिकेवरून शास्त्रीय दृष्टिकोन बाळगून विचार करता आला असता, पण ती भूमिकाच नसल्याने प्रत्येकाने आपापल्या विभागातील लोकगीतांची भरपूर उदाहरणे देऊन लेख फक्त सजवला आहे असे वाटते. श्री. पोहनेरकर, श्री. गोहल, व सौ. जोजोदिया यांच्या लिखाणामागे भावविवशतेहून थोडीशी भिन्न अशी काही दृष्टी असल्याने त्यांचे लेख वाचनीय झालेले आहेत.

पुस्तकाच्या दुसऱ्या भागात महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या भागात राहणाऱ्या जवळ जवळ सत्तर व्यक्तींनी गोळा केलेल्या ओव्या आणि गाणी एकत्र छापण्यात आलेली आहेत. त्यातील काही सुट्या सुट्या रचना काव्यदृष्ट्या फार चांगल्या असूनही बऱ्या–वाईटाची फारच भेसळ झाल्याने परिणामाला बाध येतो. तरीही यातील काही काव्ये जाणत्या रसिकाला खुलवतील अशी आहेत. एवढ्यासाठी हे मोठे पुस्तक अवश्य चाळावयास हवे. **–सरोजिनी वैद्य**

# सार-संकलन

## अमेरिकेच्या सुव्यवस्थेत अडथळे निर्माण करणारा प्रश्न

निग्रो प्रश्नावर समग्र माहिती गोळा करण्याकरता लुइ हॅरिस यानी एक राष्ट्रीय पोल घेतला होता. त्याचा निष्कर्ष खालील चौकटीत दिला आहे.* यावरून ते लिहितात: "अत्यंत महत्त्वाचे दशकात निग्रोक्रांति प्रवेश करीत असून काळया व गोऱ्या अमेरिकेचा 'मूड' काय आहे ते पहाणे जरूर आहे. नागरी हक्क विधेयकाचा कायदा झाला असून त्यावर सही होत असताच मिसिसिपी राज्यात भयग्रस्त परिस्थिती निर्माण झाली, फ्लोरिडात भांडणे सुरू झाली तर उत्तरेकडील राज्यात निग्रोविषयी असंतोष पसरू लागला. गेले कित्येक महिने अमेरिकेत वर्तमानपत्रे या चालत्या गाड्यात खीळ घालणाऱ्या प्रश्नासंबंधी, संदेह, भीति व गोंधळ निर्माण करीत आहेत.

अमेरिकेच्या यंत्रणेत या प्रश्नामुळे कितपत अडथळे निर्माण होऊ शकतील? त्याचा अध्यक्षीय निवडणुकीवर काय परिणाम होईल? दक्षिणेतील अतिरेकी सनातनी गोरे हा कायदा कितपत डावलण्याचा प्रयत्न करतील? त्यातून सर्वत्र काय प्रतिक्रिया निर्माण होईल? अध्यक्षांना जर दक्षिणेत सैन्य पाठवावे लागले तर त्याचा परिणाम काय होईल? या सर्व प्रश्नांची उत्तरे या पोलमध्ये सापडतील असे वाटते. येत्या निवडणुकीतील नागरिक हक्काचा प्रश्न जरी सर्वात मोठा राष्ट्रीय प्रश्न असला व त्यासंबंधी अनेक गोऱ्यांची प्रतिकूल प्रतिक्रिया असली तरी त्याला उग्र स्वरूप प्राप्त होऊन निवडणुकीत त्याला महत्त्वाचे स्थान येण्याची शक्यता कमी आहे.

परंतु ही परिस्थिती आमूलाग्र बदलण्याची शक्यताही पुष्कळ आहे. व त्याची जाणीव राजकारणी पुढाऱ्यांना आहे. मेरिलॅण्डच्या अध्यक्षीय प्राथमिक निवडणुकीत अलबामाचे सनातनी गव्हर्नर वॅलेस यांना ४३ टक्के मते मिळाली. तर उदारमतवादी उत्तर कॅरोलिनामध्ये गव्हर्नरपदासाठी डेमोक्रॅटिक पक्षाचा उमेदवार म्हणून डॅन मूर या वंशद्वेशी उमेदवाराची घवघवीत मतांनी निवड झाली. ही झुकत्या काट्याची दिग्दर्शने होत.

*** निग्रो क्रान्ति व अमेरिकन लोकमत**

| | राष्ट्रीय एकंदरीत | गोरी दक्षिण | उत्तरेतील गोरे अल्प सं. | निग्रो |
|---|---|---|---|---|
| **निग्रोंना पाहिजे असा विश्वास –** | | | | |
| (१) गोऱ्यांच्या नोकऱ्या | ५८% | ५६% | ६३% | २९% |
| (२) गोऱ्या वस्तीत रहाणे | ३४ | ४२ | ५० | १५ |
| (३) राजकारणात शिरकाव | ३५ | ४४ | ३५ | १३ |
| (४) गोऱ्या शाळा काबीज करणे | २५ | ३४ | २४ | १ |
| (५) गोऱ्यांशी लग्ने | २३ | ३२ | २५ | ४ |
| (६) लैंगिक संबंध | २३ | २९ | २३ | २ |
| **असे करणे चूक आहे —** | | | | |
| (१) कामगार संघटणांचे सभासदत्व नाकारणे | ८३ | ६९ | ८६ | ९९ |
| (२) चर्चमध्ये प्रवेश नाकारणे | ७९ | ४५ | ७८ | ९५ |
| (३) नोकरीवर न घेणे | ७६ | ४८ | ८२ | ९८ |
| (४) हॉटेलमध्ये प्रवेश नाकारणे | ६९ | २७ | ७७ | ९८ |
| (५) घरे भाड्याने देण्यास नाकारणे | ४५ | २२ | ४८ | ९६ |
| (६) सामाजिक क्लबात न घेणे | ४१ | १७ | ४५ | ८१ |

अध्यक्षपदाच्या निवडणुकीत मात्र जॉन्सन व गोल्डवाटर याना अनुक्रमे ७६ व २४ टक्के मते मिळाली. नागरिक हक्क कायदा ही मते थोडीफार फिरवू शकेल याबद्दल शंका नाही. परंतु मिसिसिपीतील दंग्याधोप्याविरुद्ध प्रतिक्रिया निर्माण झाली असून उत्तरेस व दक्षिणेत रक्त सांडणारी क्रान्ति टाळण्याचा आटोकाट प्रयत्न होत आहे व होत राहील हे निश्चित.

बहुतेक सर्व अमेरिकन नागरिक, उत्तरेतील विद्यार्थ्यांनी मिसिसिपीतील चळवळीत भाग घेण्यास जाण्याचे विरुद्ध असून स्थानिक अधिकाऱ्यांना शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करण्यास पुरेसा अवकाश द्यावा या मताचे आहेत. परंतु घातपात व दंगेधोपे वाढण्याची शक्यता असल्यास केन्द्रीय सरकारने लष्कराचे साहाय्याने शांतता प्रस्थापित करावी या विषयी कुणाचेही दुमत नाही. मिसिसिपीतील अधिकारीवर्गाने शाळांमधून निग्रो मुलाना वेगळे ठेवण्याचे धोरणास पाठिंबा दिला तर ते मोडून काढण्याकरता लष्कराचा सर्रास वापर करावा अशाही मताचे अनेक लोक दक्षिणेतसुद्धा सापडतात.

या सर्व भांडणात अमेरिकन जनतेची चार गटात विभागणी करता येईल.

### ( १ ) दक्षिणेतील गोरे

दक्षिणेतील बहुसंख्य गोरी जनता नागरिक हक्क विधेयकाचे विरोधी असून निग्रोंचे हक्कांची जलद प्रगति त्यांना योग्य वाटत नाही. निग्रोनी त्यासाठी निदर्शने करणेही त्याना पसंत नाही. काळी जनता आपलेपेक्षा कनिष्ठप्रतीची असून त्यांनी हॉटेलातील वाढण्याची कामे करणे सुद्धा त्यांना पसंत नाही. दक्षिणेत सनातनी गोऱ्यांचा या विधेयकास प्रखर विरोध असून त्याला वाचाही फुटत आहे. तरीसुद्धा आपल्या स्वयंसेवकाना सशस्त्र करण्यात त्यांचेतील ९५ टक्के लोकांचा विरोध आहे.

### ( २ ) उत्तरेतील अल्पसंख्य गोरे

उत्तरेतील पोलस्, हंगेरिअन, स्लोव्हॅक्स् व इटालियन नागरिक निग्रोंचे विरोधी आहेत. स्वयंचलित यन्त्रामुळे संकुचित झालेल्या नोकऱ्यांचे बाजारात निग्रो त्यांचे प्रतिस्पर्धी ठरतील याची त्याना भीती वाटते. परदेशातून निर्वासित म्हणून आलेल्या या लोकांचे आज्या पणज्यास निग्रोना असलेल्या सवलती सुद्धा मिळाल्या नव्हत्या असे ही जनता बोलून दाखविते. या प्रतिक्रियेस निग्रो बऱ्याच अंशी कारणीभूत आहेत. कारण दक्षिणेतील कट्टर निग्रो विरोधकांशी भांडताना वापरण्यात येणारी हडेलहप्पीच ते उत्तरेत वापरू पाहातात. या सर्व गोऱ्या जनतेस नागरिक हक्क विधेयक मान्य आहे असे त्याचे म्हणणे आहे. परंतु यांचे बोलण्यात व वागण्यात तफावत असून हे दुटप्पी धोरण त्यांचेवर केव्हाना केव्हातरी शेकल्याखेरीज रहाणार नाही.

### ( ३ ) उपनगर रहिवासी

अलीकडे शहारातील जवळजवळ २४ टक्के जनता उपनगरात रहावयास गेली आहे. त्याचा आम जनतेशी संबंध तुटला आहे व घर नोकर सोडले तर त्यांचा निग्रोजनतेशी बिलकूलच संबंध येत नाही. नागरिक हक्क विधेयक फारच झपाट्याने प्रगति करीत आहे अशा मताचे हे नागरिक असून गोऱ्यांच्या बऱ्याच नोकऱ्या निग्रो पटकावत आहेत असे त्याना वाटते. गोऱ्या वस्तीतील घर निग्रोला विकण्यास नाकारणे त्याना स्वाभाविक वाटते. तर सामाजिक क्लबचे सभासदत्व निग्रोस नाकारणे पण उचित वाटते. गोऱ्या अमेरिकन जनतेत वर्गवारी असून एका वर्गाचा माणूस दुसऱ्या वर्गात बळजबरीने जाण्याचा प्रयत्न करीत नाही. मग निग्रोनी आपल्या वर्गाप्रमाणे सोशल क्लबात गेल्यास वाईट ते काय आहे ! ही उपनगरी जनता निग्रोनी आपआपल्या पायरीने रहावे असे मानणारी असली तरी दक्षिणेतील निग्रो विरोधी चळवळीस त्यांचा विरोध आहे. वॅलेस व गोल्डवाटर हे नागरिक हक्क विरोधी म्हणून त्यांचे बद्दल याना सहानुभूति नाही परंतु उघडपणे वावरणाऱ्या निग्रो विरोधकांना त्यांचा मूक पाठिंबा आहे. येत्या निवडणुकीत हा पाठिंबा दृश्य झाल्यास नवल नाही.

### ( ४ ) निग्रो

अमेरिकेतील लोकसंख्येत निग्रो १० टक्के असून मतदारात ते ८ टक्के आहेत. नागरी हक्काबद्दल त्यातील काहीना घाई गर्दी झालेली दिसून येते तर काही आततायीपणा करीत आहेत असेही दिसते. परंतु








ते पराजयाचे भीतीमुळे किंवा नैराश्यामुळे नसून आपल्या चळवळीस नजीकचे भविष्यात यश येण्याची चिन्हे त्याना दिसत आहेत म्हणून. मार्टिन ल्युथर किंग (ज्युनिअर) हाच या चळवळीचा पुढारी असून नॅशनल असोसिएशन फॉर ॲडव्हान्समेंट ऑफ कलर्ड पीपल (NAACP) हीच निग्रो चळवळीची महत्त्वाची व लोकमान्य संस्था आहे. निग्रो जनतेला सामोपचाराने व समझोत्यानेच आपले प्रश्न सोडवण्याची इच्छा असल्यामुळे तो शांततेने सुटण्यास मदत होणार आहे.

या सर्वाचा अध्यक्षीय निवडणुकीवर काय परिणाम होईल ? मतांची जास्तीत जास्त घसरगुंडी जमेस धरली तरी जॉन्सन व गोल्डवाटर यांचे ७४ व २६ टक्क्यात फारसा फरक होईल असे वाटत नाही. फार तर थोडीशी मते फुटतील इतकेच. गोल्डवाटरला पाठिंबा देणाऱ्या २६ टक्के अमेरिकन नागरिकात बहुसंख्य लोक नागरिक हक्क बिलाचे कट्टर विरोधक असून गोऱ्या वस्तीत निग्रोंनी रहाणे धोक्याचे आहे असे मानणारे आहेत. निग्रोंना गोऱ्या जमातीत लग्ने करावयाची असून राज्यकारभारही हातात घ्यावयाचा आहे असा त्यांचा दावा आहे. या कनिष्ठ जातीचे, नागरिक हक्क बिल हे एक हत्यार आहे असेही ते मानतात.

या पोलने काही गोष्टी स्पष्ट केल्या असून त्यातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे निग्रोक्रांति ही अमेरिकेतील जवळ जवळ नेहमीचीच चळवळ होऊन बसणार ही होय. याचाच अर्थ ही चळवळ हळूहळू का होईना पण यशस्वी होत जाणार. गोऱ्यांनी त्यात अडथळे उत्पन्न केले तरी ते अल्पकाळ टिकणारे असून ते उग्र स्वरूप घेतील असे वाटत नाही. याचा अर्थ ते संपुष्टात आले असा नसून ते सुप्तावस्थेत आहेत व ते तसेच रहातील अशी चिन्हे आहेत.

— न्यूजवीक १३ जुलै १९६४

## कांगोचे स्वातंत्र्य

संयुक्त राष्ट्रसंघाची शेवटची सैनिक तुकडी (नायजेरिअन सैनिक) या आठवड्यात कांगोतून बाहेर पडणार. एकवीस राष्ट्रांचे २३६ सैनिक कांगोत शांतता प्रस्थापित करण्याचे प्रयत्नात कामी आले. त्यांना शेवटची सलामी देण्याखेरीज कोठचाही निरोपाचा समारंभ होणार नाही व तेच उचित आहे असे वाटते.

३० जून १९६० रोजी बेल्जिअम सत्तेखालून स्वतंत्र झालेले हे राष्ट्र संयुक्तराष्ट्राने चार वर्षे केलेल्या अपरिमित व अविश्रान्त प्रयत्नांना न जुमानता जेथल्या तेथेच आहे. हे कबूल करणे सुद्धा लज्जास्पद आहे. एका नायजेरिअन लष्करी अधिकाऱ्याचे म्हणण्याप्रमाणे अजून दहा वर्षे तरी ही जनता स्वातंत्र्य मिळण्यास लायक होणार नाही. परंतु गेल्या आठवड्यात घडलेल्या घटनांनी या विधानास सुद्धा खोटे आशावादी ठरविले आहे. पूर्वेकडील किवू व नैऋत्येकडील क्विलु हे प्रदेश पेकिंगचा पाठिंबा असलेल्या बंडखोरांनी पादाक्रान्त केले आहेत. ही बंडे स्टान्ले व्हिले व अल्बर्टव्हिले या शहरात पसरली असून बालुआ जमातीने शहरे ताब्यात घेतली आहेत. त्यांनी अनेक युरोपिअन बायकांना सतावले असून, ७० युरोपिअन नागरिकांना गिरफदार केले आहे. उत्तर कटांगाचे अध्यक्ष जेसन सॅन्डवे यांचा खून करण्यात आला. येथे लाल चीनने आपले पाय चांगलेच रोवले असून दक्षिण व्हिएटनाम मधील व्हिएटकाँग सारखी गनिमी चळवळ येथेही सुरू करता येईल असे मोठ्या आनंदाने पेकिंग येथील जेनमिन-जि-पाओने घोषित केले आहे.

अमेरिकेपुढे उभ्या असलेल्या तीन आंतरराष्ट्रीय कूट प्रश्नांपैकी कांगोचा नंबर आग्नेय आशिया व सायप्रस यांचेनंतर म्हणजे तिसरा लागतो. न्यूजवीकचा युरोपिअन वार्ताहर कांगोची सफर केल्यानंतर लिहितो की, " कांगो म्हणजे एक छाती दडपणारे सुररिॲलिस्ट दुःस्वप्न आहे. कोठल्याही पाश्चिमात्य किंवा पौर्वात्य फार काय आफ्रिकन राष्ट्राची सुद्धा त्यास तोड नाही. डोळ्यानी बघितलेल्या वस्तुस्थितीवर सुद्धा विश्वास बसणे कठीण जाते. परंतु हेच ते कांगो हे विसरून चालत नाही. "

या देशातील संरक्षणमंत्र्याला लष्करातील दुय्यम अधिकाऱ्याची सुद्धा भीती वाटते व आपल्या पावलांच्या आवाजाची कुणास चाहूल लागू नये म्हणून नुसते मोजे घालूनच पलायन करावे लागते. युद्धामध्ये येथील लष्करी मोटारी व वहाने उलटी चालतात. कारण द्रुतगतीने पीछेहाट करणे त्याना जास्त महत्त्वाचे वाटते. कर्नलसारख्या उच्च दर्जाचे अधिकाऱ्यास बंडखोर वस्त्यांची विमानातूनसुद्धा पहाणी करण्याची








भीती वाटते. तर नखशिखान्त सशस्त्र असलेल्या सैनिकांना धनुर्धारी जंगली बंडखोरावर बंदुका चालवण्यात आत्मविश्वास वाटत नाही. कारण हे जंगली बंडखोर चेटकी डॉक्टरने तयार केलेल्या गोळ्या खाल्ल्यामुळे अमर झाले आहेत असा त्यांचा समज असतो. येथे मशिनगन, हॅंडग्रेनेड व बॉम्बस् यांच्या आवाजाच्या ध्वनिमुद्रिका लावून संयुक्तराष्ट्रांचे मुलकी अधिकाऱ्यात गोंधळ व धावपळ निर्माण करता येते. तर २००० डॉलर्स महिन्याचे उत्पन्न असलेला बेल्जिअन वकील आपला युरोपातील धंदा सोडून अनेक औद्योगिक कंपन्या व सरकारसुद्धा त्याचे दुप्पट पैशात विकत घेण्याचे इराद्याने कांगोत स्थायिक होण्यासाठी येतो.

कांगो या अवाढव्य भूभागावर केंद्रीय सत्ता अभावानेच अस्तित्वात आहे. १९५६ सालपासून आफ्रिकेतील ३१ राष्ट्रे स्वतंत्र झाली. परंतु कांगो इतका गोंधळ कोठेही अस्तित्वात नाही. या देशात गेल्या चार वर्षात भूकमारीने व लढाईत दहा लाख लोक मृत्युमुखी पडले. कांगोतील २०० जमातींना एकत्रित राखणारे बेल्जिअन लष्कर निघून गेल्याबरोबर येथे अराजक माजले.

कांगोची लोकसंख्या अवघी दीडकोट असून दैनिक वर्तमानपत्राचा खप फक्त तीस हजार आहे. परंतु येथे मंत्र्यांना मात्र तोटा नाही. येथील निरनिराळ्या एकवीस प्रांतामिळून साधारणतः ३०० मंत्री अधिकारावर आहेत. नुकत्याच बोलावलेल्या एकवीस प्रांतांचे शिक्षणमंत्र्याचे परिषदेस २८ शिक्षणमंत्री हजर झाले. कारण पदच्युत केलेल्या मंत्र्यांनी अधिकार सोडण्याचे सपशेल नाकारले. स्टान्लेव्हिले येथे बडतर्फ केलेल्या दोन मंत्र्यांनी अधिकार सूत्रे खाली ठेवण्यापूर्वी स्वतःचे नावाने तीस हजार डॉलर्सचे चेक लिहून घेतले.

परंतु या असंख्य मंत्र्यांचे गोंधळात कांगोला पुढारीच नाही. येथील सर्वजीवन दुष्टचक्रात सापडले असून त्यातून मार्ग काढणे कठीण झाले आहे. येथे राज्यकारभार चालवू शकतील असे विश्वासू मुलकी अधिकारी नाहीत. लष्कर म्हणजे गैरशिस्त, ठग, चोर खुनी, दरवडेखोर व गुन्हेगार लोकांचा बाजार असून राष्ट्रप्रेम किंवा राष्ट्रीयत्व याची जाणीवही कोठे दिसत नाही. संयुक्तराष्ट्रांनी आपले लष्कर काढून घेतले असले तरी ४८ राष्ट्रांतून मिळवलेले ६३१ कारागीर व ८०० शिक्षक कांगोत त्यांचे वतीने काम करीत आहेत. परंतु त्यांचेसुद्धा जीवास धोका असून क्विलु व किवु या प्रातात रहाणे त्यांना अशक्य आहे.

लिओपोल्डव्हिले येथील कांगोचे पंतप्रधान अडुला हे कमकुवत, सोडघाल करणारे व कांगोत पाळेमुळे नसलेले गृहस्थ आहेत. त्यांची सत्ता ५०० पॅराट्रूपसवर अवलंबून असून हे सैनिक सेनापती जोसेफ मोबुतो यांचेशीच फक्त स्वामिनिष्ठ आहेत असा समज आहे. क्विलु बंडाचे वेळी सेनापती मोबुतो युरोपिअन राष्ट्रांचा पाहुणचार घेत युरोपात फिरत होते. या सैनिकांची स्वामीनिष्ठा फक्त जेत्यांचे बाजूस आहे हे मात्र खरे.

सार्वत्रिक निवडणुका होईपर्यंत अध्यक्ष कासावुबु यांचेकडे सर्वाधिकार आहेत. सर्व जमातींची गोलमेज परिषद बोलावण्यात येणार असून सर्व भूमिगतांना पण त्याचे आमंत्रण आहे. शोंबे हे लिओपोल्डव्हिलेत दाखल झाले असून त्यांचेकडे पंतप्रधानकीची सूत्रे येतील अशी चिन्हे स्पष्ट दिसत आहेत. संयुक्त राष्ट्रास पुरेपूर नापसंत असलेला विरोधी नेता कांगोची राज्यसूत्रे हाती घेणार हा दैवदुर्विलासच म्हटला पाहिजे. कासावुबु यांचे हे धोरण अमेरिकेत विपरीत प्रतिक्रिया निर्माण केल्याखेरीज राहाणार नाही. कारण शोंबे यांचा जास्तीतजास्त राग अमेरिकेवर आहे. नॅशनल कमिटी ऑफ लिबरेशन या कम्युनिस्ट पाठिंबा असलेल्या संघटनेस गोलमेज मंत्रिमंडळात स्थान देण्यात येणार आहे. ही संस्था चीनी कम्युनिस्ट व युरोपमधील रशियाविरोधी कम्युनिस्ट यांचे नेतृत्वाखाली काम करीत असून कांगोतून युरोपिअन संस्कृतीची पाळेमुळे खणून काढण्यासाठी झटत आहे. आफ्रिकॅनिझम, निग्रोवर्चस्व व जमातवाद ( Tribulism ) यांचा प्रसार करून देशाची पुनर्रचना करणे हा या संस्थेचा कार्यक्रम आहे.

कम्युनिस्ट प्रोत्साहनामुळे अनेक कांगोलीज लोक पाश्चात्य पोषाख टाकून देऊन कातड्यांचे कपडे घालू लागले आहेत. शरीरे भडक रंगानी रंगविणे, धनुष्यबाण व भालेबरच्यासारखी पुरातन शस्त्रे वापरणे ही देशभक्तीची लक्षणे समजली जाऊ लागली आहेत. यात लाल चीन हा हात प्रामुख्याने दिसून येतो. त्यांनी

कांगोलीजकरता एक पुस्तिका प्रसिद्ध केली असून त्यातील पहिली बावीस पाने बंडाचे शिक्षण देण्यात खर्चली आहेत. पुढील बारा पानात घातपाती कृत्ये, भूमिगत चळवळीसंबंधी धडे, शत्रूवर खुनी हल्ले करण्याचे तंत्र याची चर्चा केली आहे. कांगोली लोकांनी ही सर्व विद्या आत्मसात करून देशाचा महत्त्वाचा भाग पादाक्रान्त केल्याखेरीज आंतरराष्ट्रीय मदत मिळू शकणार नाही असेही त्यात स्पष्ट बजावले आहे. परंतु येथील बेल्जिअन लोकांना कम्युनिस्टांची भीती वाटत नसून, कोठलाही कांगोली प्रदेश कम्युनिस्टांचा विश्वासू मित्र बनेल असे त्याना वाटत नाही. कारण येथील जमातींचे ध्येय मार्क्सिस्ट स्वर्ग निर्माण करावयाचे नसून भ्रामक समजुतीवर आधारलेले जंगली जमातींचे राज्य स्थापन करणे हे आहे. येथे चेटकी वैद्यकाचा सुकाळ झाला असून सरकार व बंडखोर एकमेकास शह देण्यासाठी त्याचा सर्रास उपयोग करीत आहेत.

बंडाचा तडाखा पहिल्याप्रथम पोर्तुगीज मळेवाल्यास बसला. सरकारी यंत्रणा हालचाल करीपर्यत कित्येक आठवडे निघून गेले. त्यानंतर सरकारी लष्कर धनुर्धारी बंडखोरास पाहून पळत सुटले. अमेरिकेने पाठवलेल्या सहा क्युबन लष्करी शिक्षकांनी पुढाकार घेऊन बंडखोरावर रॉकेटस सोडले. त्यात शेकडो बंडखोर मृत्युमुखी पडल्याचे प्रत्यक्ष पाहिल्यावर सरकारी लष्कर परत फिरले व त्यानी बंडाचा बीमोड केला. परंतु या सरकारी लष्कराची सुद्धा शिक्षा करण्याची पद्धत अंगावर शहारे आणणारी आहे. अजाण निःशस्त्र नागरिकावर बंदुका चालवणे, त्यांना पोटात, कंबरेत व जांघेत लाथाबुक्यांनी मारणे, हातपाय बांधून धुळीत पालथे लोळवणे, ओल्या दोराने करकच्च बांधणे अशा अनेक जंगली शिक्षा अजूनही रूढ आहेत. व यामुळे सामान्य नागरिकास बंडखोरांबद्दल सहानुभूति वाटल्यास नवल नाही. एक बंड मोडले तरी पुन्हा अनेक बंडे होण्याची शक्यता आहे व ती मोडण्यास लागणारे लष्कर कांगो सरकारकडे नाही. अस्तित्वात असलेल्या लष्करात शिस्त किंवा स्वामिभक्ति नाही, ते कोणाचाही हुकूम पाळीत नाहीत व हत्याराघात्यारासह शत्रूस जाऊन मिळण्याचे पण त्यांना काही वाटत नाही.

या राजकीय व लष्करी गोंधळात कांगोची अर्थव्यवस्था मात्र मोडून पडली नाही. तरीसुद्धा शेती निकालात निघाली आहे. उद्योगधंदे मात्र बेल्जिअन लोकांचे ताब्यात असून व्यवस्थितपणे चालले आहेत. तांब्याच्या खाणींचे उत्पन्न वाढले असून त्यातून होणाऱ्या नफ्यातून साबू, कापड, सिमेंट व प्लॅस्टिक सारखे उद्योगधंदे उभे करण्यात येत आहेत. या सर्वांचे उत्पन्न १९५९ साल पेक्षा पंचवीस टक्क्याने वाढले आहे. एवढी अवाढव्य संपत्ती जर या देशात नसती तर कांगोचे खरेखुरे जंगल केव्हाच झाले असते.

कांगोची नैसर्गिक संपत्ती कोठल्याही औद्योगिक राष्ट्राचे तोंडास पाणी सोडील. फ्रान्सने ४०० तन्त्रज्ञ व मुलकी अधिकारी विनामूल्य देऊ केले आहेत. ही माणसे संयुक्तराष्ट्र किंवा बेल्जिअमने देऊ केलेल्या मंडळीपेक्षा जास्त निष्णात असल्यामुळे साहजिकच महत्त्वाच्या जागा पटकावतील. ड गॉलचे मते कांगो हे जगातील फ्रान्सचे बाहेरील सर्वात मोठे फ्रेंच बोलणारे राष्ट्र आहे. अमेरिका कांगोच्या इंगा धरण योजनेत लक्ष घालीत असून या योजनेमुळे कांगोत प्रति न्हूर निर्माण होण्याची शक्यता आहे. परंतु अजून तरी बेल्जिअम व अमेरिका यांचे कांगोविषयक धोरण अस्थिर आहे. बेल्जिअमने कांगोत राजकीय हस्तक्षेप करण्याचे नाकारल्यास अमेरिकेला या संपन्न आफ्रिकन राष्ट्राचे कारभारात सरळ सरळ हात घालावा लागेल किंवा ते राष्ट्र कम्युनिस्ट चीनच्या कह्यात गेलेले पहावे लागेल."

न्यूजवीक ६ जुलै १९६४

## आग्नेय आशियातील
## अमेरिका व ब्रिटन यांची युद्धे

आशियातील राजकीय सुरक्षा व समतोलता अखेरीस आशिआई राष्ट्रावरच अवलंबून रहाणार आहे. यात चीन व इंडोनेशियाचा पण समावेश होतो; पण बार्मिंगहॅम-अल्बाया किंवा बार्मिंगहॅम-इंग्लड येथील सैनिकांचा मात्र होत नाही हे नक्की. ही गोष्ट ब्रिटिश व अमेरिकन सरकारातील महत्त्वाचे लोकांना मान्य असून त्याचे परिणामही त्यांचे ध्यानात आल्याखेरीज राहिलेले नाहीत.








अमेरिकेतील काही दुराग्रही लोकांना प्रथम चीनचा पराभव (कशा करता? व कसा?) करण्याची स्वप्ने पडत असली तरी वाशिंग्टन मधील जाणत्या लोकांना इंडोनेशियातील पेचप्रसंग सामोपचारानेच सोडविला पाहिजे हे पटले आहे. त्याचप्रमाणे मलेशियाची जबाबदारी आपण नेहमीच घेऊ शकणार नाही याची जाणीवही लंडनमध्ये आहे. त्या देशाचे भवितव्य तेथील जनतेच्या ऐक्याने व आत्मविश्वासाने सुटणार आहे. या प्रदेशातील सत्तासमतोलता नेहमीच आपल्या हाती असावी म्हणून व्हिएटनाममध्ये अमेरिकन सैनिक किंवा बोर्निओत ब्रिटिश सैनिक प्राण पणास लावीत आहेत हे म्हणणे चूक आहे. त्यांचे ध्येय वेगळे परंतु यापेक्षा कितीतरी नम्र आहे. आशिआई राष्ट्रांना आपसातील संबंध सलोख्याचे करण्यास मदत करून त्यांचे राजकारणातून आपला हात काढून कसा घेता येईल याचीच चिंता या दोन्ही राष्ट्रांना आहे.

परंतु नजीकचे काही दिवस त्रासदायक आहेत याबद्दल मात्र शंका नाही. अमेरिकेचे इंडोनेशियातील प्रश्न व ब्रिटनचे बोर्निओतील प्रश्न जवळ जवळ एकच आहेत. परंतु त्यांना मात्र त्याची पुरेशी जाणीव नाही असे वाटते. या दोन्ही देशातील परिस्थिती एकाच समस्येचे दोन भाग आहेत. अध्यक्ष सोकार्नो यांचे आढ्यतखोरपणाचा ब्रिटिशांना राग येतो पण हजार मैल उत्तरेस अमेरिका आपल्यासारख्याच परिस्थितीला तोंड देत आहे हे त्यांना समजत नाही. तर अमेरिकेतील काही लोकांना ब्रिटन व इंडोनेशिया यांचेतील भांडणाचे पर्यवसान इंडोचायना कम्युनिस्ट बनण्यात होत आहे असे वाटते.

चीनचे पोटाखालील आग्नेय आशियात टिकावू शांतता राखण्याचे दोन मार्ग आहेत : एक म्हणजे इंडोनेशिया हे चीनचे वर्चस्वापासून मुक्त होऊन चीनच्या तोडीचे स्वतंत्र राष्ट्र बनणे. आणि या प्रदेशातील परिस्थितीचा साकल्याने विचार करता नजीकच्या भविष्यकाळात चीन व इंडोनेशिया ही दोनच बलाढ्य राष्ट्रे या भूभागावर वर्चस्व गाजवू शकतील असे दिसते. अमेरिकेने याच मार्गाने सुरवातीस आग्नेय आशिआचा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला होता. परंतु इंडोनेशियाच्या अस्थिर धोरणामुळे व डॉ. सोकार्नोंच्या सत्तेच्या अशाश्वततेमुळे हा मार्ग टिकावू होणार नाही असे ब्रिटन व अमेरिका या दोघांचेही मत आहे.

दुसरा मार्ग जास्त गुंतागुंतीचा आहे. यात फक्त चीन व इंडोनेशिया यांतच समतोलता साधावयाची नसून अनेक बारीक राष्ट्रांचे हितसंबंध लक्षात घ्यावयाचे आहेत. या छोट्या राष्ट्रांचे स्वातंत्र्यप्रेम ही एकमेव गुरुकिल्ली या प्रांतातील सुरक्षा व शांतता राखण्यास उपयोगी पडेल. यासाठी उत्तरेत सायगाव व रंगून यांचे दरम्यान स्वतंत्र राष्ट्रे टिकविण्याचा अमेरिका प्रयत्न करीत आहे तर दक्षिणेत लोकशाहीचा ब्रिटिश वारसा मिळालेली लोकशाही सत्ताकेन्द्रे मजबूत करण्यात ब्रिटन गुंतले आहे. हे दोन्ही प्रयत्न एकमेकाशी इतके निगडित आहेत की त्यातील एक फसला तर त्याचा दुसऱ्यावर भयंकर परिणाम होऊन तोही सोडून द्यावा लागेल.

या मूलभूत एकतेमुळे अमेरिका इंडोनेशियात किंवा ब्रिटन बोर्निओत काय करीत आहे यास महत्त्व रहात नाही. अमेरिकेस कम्युनिस्टांना तर ब्रिटनला डॉ. सोकार्नोला (त्याचे मागेही कम्युनिस्ट भूत आहेच) तोंड द्यावे लागत आहे. आपल्या वसाहतीत शांतता व सुव्यवस्था राखून ब्रिटनला काढता पाय घेण्याचे धोरण अंमलात आणावयाचे आहे तर फ्रेंचानी वसाहत सोडताना निर्माण केलेल्या गोंधळातून इंडोनेशियाला मुक्त करण्याची अमेरिकेची धडपड आहे. या प्रदेशातील लहान थोर राष्ट्रांनी गोरे लष्कर निघून गेल्यावर सुद्धा गुण्यागोविंदाने एकत्र रहावे व स्वातंत्र्य उपभोगावे ही ब्रिटन व अमेरिका या दोन्ही राष्ट्रांची इच्छा आहे.

दुर्दैवाने या दोन्ही युद्धक्षेत्रात एक लष्करी धोरण आखण्यात येत नाही. दोन्ही लष्करांचे प्रश्न एकच आहेत. अत्यंत खडतर प्रदेशात गनिमीकाव्याने लढणाऱ्या शत्रूला त्याना तोंड द्यावे लागत आहे. या प्रदेशातील ग्रामीण जनता युद्धास कंटाळली आहे. क्युबा किंवा बर्लिनच्या प्रश्नासारखी आणीबाणी इथे निर्माण होऊ शकत नाही व त्यामुळे प्रश्न तडकाफडकी सुटतही नाहीत.

परंतु या दोन्ही ठिकाणी ताबडतोब काहीतरी करण्याची आवश्यकता आहे हेही निर्विवाद. येथील






लढाईच्या निकालावर जगातील बलाढ्य राष्ट्रातील सत्ता-समतोलता अवलंबून आहे. राष्ट्रविमोचनाचे निमित्ताने दोन बलाढ्य पाश्चात्य राष्ट्राशी सुरू केलेल्या लढाया जर चीनला जिंकता आल्या तर क्रुश्चेव्ह व माओ यांचे भांडणातील मुख्य मुद्यावरच माओचा विजय होईल.

अशा परिस्थितीत लढाई हरण्यापेक्षा ती पसरविण्याची अमिरिकेची तयारी असल्यास नवल नाही. जनरल टेलर यांची व्हिएटनाममधील नेमणूक या धोरणातील पहिले पाऊल आहे. त्याचप्रमाणे सोकार्नोंच्या ताब्यातील सुमात्रा बेटावर ब्रिटिश गनीम सोडण्याचे ब्रिटिश धोरण याच योजनेत बसते. शत्रूचा मानसिक त्रास वाढविणे युद्धात जरूर असते. आंतरराष्ट्रीय सत्तास्पर्धेत दिलेल्या धमक्या प्रत्यक्षात आणण्याची तयारी असावी लागते. म्हणूनच या दोन्ही ठिकाणी युद्धाचा धडाका उडण्याची शक्यता निर्माण झालेली आहे. हा निवळ जकार्तातील काळ्या हुकूमशहाला वठणीवर आणण्याचा किंवा आग्नेय आशियातून कम्युनिस्टांचा नायनाट करण्याचा प्रयत्न नसून जगातील बलाढ्य राष्ट्रातील सत्तास्पर्धेत समतोल राखण्याचा प्रयत्न आहे. यातूनच दोन्ही गटाना योग्य वाटणारा व या प्रदेशातील जनतेच्या हिताचा समझोता होण्याची पण शक्यता आहे. परंतु या धाकदपडशात अनेक मनस्तापाचे व आणीबाणीचे प्रसंग निर्माण होतील. त्यातून विचाराने व सलोख्याने प्रश्न सोडविण्याची पाश्चात्यांनी तयारी दाखवणे जरूर आहे.

हे एक कोडे असून त्यातून दोस्त राष्ट्रांनी योग्य तो बोध घेतला पाहिजे. गेल्या वीस वर्षात जग अत्यंत लहान झाले असून त्यातील बहुतेक सर्व प्रश्न दोस्त राष्ट्रांनी एकत्र विचार करून सोडवण्याचा प्रयत्न केला तरच सुटतील.

दि इकॉनॉमिस्ट लंडन
२७ जून १९६४

---

❀ मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

❀ या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

❀ मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.



अनुक्रमणिका






